# पैगंबर मुहम्मद (स.) सर्वांसाठी

लेखक

**डॉ. मुहम्मद अहमद**

अनुवाद

**झाहिद आबिद खान**



# अनुक्रमणिका

## भाग २

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे."

# सांकेतिक शब्दार्थ

या पुस्तकात काही शब्द संक्षिप्त स्वरूपात वापरले गेले आहेत. त्यांचा संपूर्ण अर्थ माहीत असणे आवश्यक आहे, जेणेकरून पुस्तकाचे अध्ययन करताना अवघडल्यासारखे वाटणार नाही. खाली असे काही शब्द देण्यात आले आहेत.

(अ.) : पूर्ण शब्द असा आहे 'अलैहिस्सलाम' अर्थात त्यांना शांती (सुरक्षा) प्राप्त होवो! पैगंबर व देवदूतांच्या नावापुढे हे आदर व शुभेच्छादर्शक शब्द जोडले जातात.

(स.) : पूर्ण शब्द असा आहे 'सल्लल्लाहु अलैहि व सल्लम'.

अर्थात : 'अल्लाह त्यांच्यावर कृपा शांतीचा वर्षाव करो.' पैगंबर मुहम्मद (स.) यांचे नाव लिहिताना, उच्चारताना व ऐकताच त्यांच्यावर आदर व शुभेच्छा दर्शविणारे हे शब्द उच्चारले जातात.

(रजि.) : पूर्ण शब्द असा आहे, 'रजियल्लाहु अन्हु' अर्थात 'अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न व्हावे.' पैगंबरांचे सोबती व सहकाऱ्यांच्या नावासोबत हे आदर व शुभेच्छादर्शक शब्द जोडले जातात.

(पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत राहणाऱ्या पुरुषांना 'सहाबी' व महिलांना 'सहाबिया' म्हणतात.)

(रजि.) : सहाबियांच्या नावासोबत 'रजियल्लाहु अन्हा' व सहाबांच्या नावासोबत 'रजियल्लाहु अन्हुम' असे शब्द जोडले जातात.

# भूमिका

मनुष्याला जगातल्या त्या सर्व गोष्टी स्पष्टपणे दिसतात, ज्यांच्या आधारे त्याच्या भौतिक गरजा पूर्ण होऊ शकतात. एवढेच नव्हे तर त्याला एकाहून एक सुंदर वस्तु दाखविल्या जातात. आम्हाला पक्षी व प्राण्यांचे सुमधुर स्वरही ऐकू येतात. मात्र माणसाचे एवढ्याने समाधान होत नाही. त्याला त्यापेक्षा काही जास्त हवे असते. तो आकर्षक वस्तू व सुंदर दृष्यांचे वर्णन सुमधुर शब्दांत ऐकून त्यांचे वास्तविक व संपूर्ण रहस्य जाणून घेऊ इच्छितो व त्यांच्या आधारे जगात स्वत:चे स्थान निश्चित करू पाहतो. तो स्वत:चे जीवन सार्थक करू पाहतो.

ज्याने जगाचे योग्य प्रकारे निरीक्षण केले आहे व त्याचे अस्तित्व जाणून घेतले आहे, त्याचे हृदय भारावून गेल्याशिवाय राहत नाही. त्याला सर्व काही नवेनवेसे वाटू लागते. त्याच्या मनात विशिष्ट प्रकारच्या भावना निर्माण होतात. त्याला वेगळ्याच प्रकारच्या संवेदनांचा आभास होतो. तरीही काहीतरी अस्पष्ट राहून गेले आहे असे वाटते. जशा सायंकाळी बऱ्याचशा वस्तु सुस्पष्ट दिसत नाहीत, प्रकाशात तिमिराचे मिश्रण झाल्यासारखे वाटते, निळ्या आकाशावर ढगांचे हलकेसे आवरण असल्यासारखे वाटते.

एखाद्या भावुक व्यक्तीस पर्वतांचे बर्फाच्छादित शिखर, वृक्ष व त्यावर उमललेल्या सुंदर फुलांच्या सौंदर्याने जीवनाच्या सौंदर्याचा आत्मिक आनंद प्राप्त होऊन त्याला आपण जीवनाचे सखोल ज्ञान प्राप्त केले आहे, असा भास निर्माण होतो. मात्र इतके ज्ञानाभास प्राप्त होऊनही तो संशयाच्या जाळ्यातून मुक्त होत नाही. मनात शंका निर्माण होत राहते की, जे काही आपणास कळाले आहे ती केवळ आपल्या मनात निर्माण झालेली कल्पना असून ज्या सत्याचा आम्ही शोध घेत आहोत ते अद्याप अनाकलनीय आहे.

मनुष्याने असामंजस्याच्या मन:स्थितीत जीवन व्यतीत करावे ही अल्लाहाला आवडणारी बाब नाही. म्हणून त्याने मानवास संशयाच्या जाळ्यातून मुक्त करण्यासाठी पैगंबरांना पाठविण्यांचा क्रम सुरू केला व आपला संदेश (ईशवाणी) त्यांच्यामार्फत लोकांपर्यंत पोहचविला व मूक रहस्यांना बोलते केले. मनुष्याच्या मनातला संशयकल्लोळ शांत झाला. त्याचे मन प्रकाशमान झाले. अल्लाहने आदेश दिला की विवेकपूर्ण वागा.

''प्रत्येक वस्तू जी आकाशात व पृथ्वीत आहे त्याचे पवित्रगान करीत

आहे.'' *(दिव्य कुरआन, ५९:२४)*

''मीच अल्लाह आहे. माझ्याशिवाय कोणीच ईश्वर नाही. म्हणून तू माझीच भक्ती कर.'' *(दिव्य कुरआन, २०:१४)*

अल्लाह केवळ शक्तिशाली नसून अत्यंत दयावान आहे. तो मानवी मनातल्या सर्व शंका दूर करणारा आहे.

अल्लाहचे संदेशवाहक पैगंबर बहुसंख्य होते. त्यांनी हेच म्हटले आहे,

''हे माझ्या जातिबांधवांनो! अल्लाहची भक्ती करा. त्याच्याशिवाय तुमचा कोणी ईश्वर नाही. मग काय तुम्ही दुर्वर्तनापासून दूर राहणार नाही?''

*(दिव्य कुरआन, ७:६५)*

पैगंबराने दाखवून दिले की, जीवन व जग म्हणजे काय? मानवाची सफलता कशावर अवलंबून आहे व तो असफल का होतो? पैगंबर मुहम्मद (स.) हे अल्लाहने पाठविलेल्या पैगंबरांच्या श्रृंखलेतले अंतिम पैगंबर आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जाहीर करून टाकले आहे की, त्यांच्यानंतर कोणताच पैगंबर येणार नाही व ते संपूर्ण मानवजातीचे मार्गदर्शक म्हणून आहेत. मनुष्य मग तो कोणत्याही समाजातील असो, कुठेही राहत असो, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दाखविलेल्या मार्गाचा अवलंब करून जीवन सफल करू शकतो व अल्लाहाची जवळीक प्राप्त करू शकतो. मात्र तो तसे करण्यास नकार देत असेल, तर जीवन व जीवनाच्या खऱ्या उद्देशाची उपेक्षा करीत असल्याचे सिध्द होईल व हा अक्षम्य अपराध ठरेल.

लोकांना पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याबाबत संपूर्ण तपशील माहीत नसल्यामुळे पैगंबर मुहम्मद (स.) व त्यांच्यामध्ये जो मधुर संबंध आहे त्याची लोकांना मुळीच जाणीव नाही. डॉ. मुहम्मद अहमद यांनी अल्लाहाचे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनावर पुस्तक लिहून फार महत्त्वाचे कार्य केले आहे. या पुस्तकाच्या अध्ययनाने वाचकांना मुहम्मद (स.) यांच्याबाबत सत्य माहिती प्राप्त होईल, आमचा विश्वास आहे की, मुहम्मद (स.) यांना संपूर्ण मानवजातीसाठी पाठविण्यात आले आहे. आमची मनापासून प्रार्थना आहे की हे पुस्तक जास्तीतजास्त लोकांपर्यंत पोहचावे व ते लाभान्वित व्हावेत.

दि. २० सप्टेंबर २००० विनित

मुहम्मद फारुक खान

भाग १

# अंतिम पैगंबरांची आवश्यकता

अल्लाहचे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या चरित्राचे अध्ययन करण्यापूर्वी हे जाणून घेण्याची गरज आहे की, मानवतेच्या कल्याण, उत्थान व उन्नतीसाठी त्यांनी जे कार्य जीवनभर केले त्याचे मूळ स्वरूप, त्याचे कार्यक्षेत्र व त्याची मुख्य वैशिष्ट्ये कोणती होती? अल्लाहाने मानवावर अगणित उपकार, अनुग्रह व कृपा केली आहे. त्याला सर्व प्राण्यांमध्ये श्रेष्ठ स्थान दिले असून वैचारिक शक्ती व विवेकबुध्दी प्रदान केली आहे. मानवास त्याने आपल्या ज्ञान व मार्गदर्शनाच्या प्रकाशझोतात पाठविले आहे. पैगंबर आदम (अ.) प्रथम मनुष्य व अल्लाहचे पहिले पैगंबरही होते. अल्लाहने त्यांना आदेश दिले होते की, त्यांनी आपल्या संततीला इस्लामचे शिक्षण द्यावे. अर्थात त्यांना उपदेश द्यावा की, अल्लाह एक आहे आणि तोच तुमचा व सर्व मानवांचा उपास्य आहे. त्याची उपासना व भक्ती करा, त्याच्याचसमोर नतमस्तक व्हा, त्याच्याचकडे मदतीची याचना करा व त्याच्याच आज्ञेचे पालन करून कल्याणकारक व सदाचाराचे जीवन व्यतीत करा. जर तुम्ही असे वागलात तर तुम्हाला पुरस्कार दिला जाईल व पारलौकीक स्वर्गात प्रवेशास पात्र ठराल, मात्र तुम्ही जर तसे न वागता अल्लाहाने दिलेल्या स्वतंत्र वैचारिक बुध्दीचा दुरूपयोग करून अवज्ञा केली व स्वैराचारी झालात तर दंडित केले जाल व नरकात झोकले जाल.

पैगंबर आदम (अ.) यांच्या प्रस्थानानंतर काही काळापर्यंत त्यांच्या संततीने त्यांच्या इस्लामी उपदेशाचे पालन केले, मात्र हळूहळू त्यांना त्यांच्या उपदेशांचा विसर पडला. कालांतराने त्यांना नैतिक मूल्यांचा विसर पडला. एकेश्वरत्वाऐवजी अनेकेश्वरत्वाचा प्रसार होऊ लागला. आराध्यांची अनेक रूपे निर्माण झाली. मूर्तिपूजेसह निसर्गाचीही पूजा सुरू झाली. वृक्ष, पर्वत, सूर्य, चंद्र, वारा, पाणी इत्यादींची पूजाअर्चा होऊ लागली. आदम (अ.) यांची संतती जगाच्या विविध भागांत पसरली व तिचे इतके अध:पतन झाले की, ते चांगल्या बाबींना वाईट व वाईट गोष्टींना चांगले समजू लागले.

अल्लाहने मानवांची दुर्दशा पाहून त्यावर उदार अनुग्रहाने त्यांच्या सुधारणेसाठी व मार्गदर्शनासाठी संदेशवाहक, पैगंबर, रसूल, नबी, ईशदूत पाठविले. या सर्व पुण्यात्मा व महापुरुषांनी तेच उपदेश केले जे पैगंबर आदम (अ.) यांनी केले होते. जगाच्या प्रत्येक भूभागात अल्लाहाचे पैगंबर आले व त्यांनी अल्लाहाच्या मर्जीनुसार जीवन व्यतीत करण्याचा सल्ला दिला. अंधकारातून प्रकाशाकडे ज्ञानाचा सरळमार्ग दाखविला. परंतु मानवी वृत्तीच मुळी विचित्र आहे. लोकांनी अल्लाहाच्या पैगंबरांशी चांगला व्यवहार केला नाही. ते मानवाच्या कल्याणासाठी आले होते, लोकांनी मात्र त्यांच्याशी दुर्व्यवहार करत त्यांना देशांतर करण्यास भाग पाडले. काहींची तर हत्याही केली. तरी अल्लाहाच्या

पैगंबरांचे कार्य चालूच राहिले. हळूहळू लोकांना त्यांचा उपदेश कळू लागला. लोक त्यांचे अनुयायी होऊ लागले व त्यांचे सहकारी बनून अल्लाहच्या आदेशांचे पालन करू लागले. सर्वच पैगंबर व संदेशवाहकांनी इस्लामचेच शिक्षण दिले. त्यांनी जगातून प्रस्थान केल्यानंतर त्यांच्या अनुयायांनी अज्ञान व अंधश्रध्देमुळे त्या महापुरुषांना अल्लाह, ईशपुत्र व ईशगुणधारी मानून त्यांचीच पूजा सुरू करून टाकली. तेच त्यांचे उपास्य झाले. खरे म्हणजे महापुरुषांनी याच धारणेपासून अलिप्त राहण्याचे शिक्षण दिले होते. आश्चर्याची बाब म्हणजे ज्या वाममार्गापासून लोकांना आलिप्त राहण्याकरिता महापुरूषांनी जिवाचे रान केले, बलिदान दिले, (जेणेकरून मानवाने उत्कर्ष साधावा) लोकांनी त्याच वाममार्गाचा स्वीकार करून स्वत:चे पतन करून घेतले. अल्लाहच्या पैगंबर व संदेशवाहकांच्या उपदेशास विकृत स्वरूप देऊन मनाला येईल तशा अकल्याणकारी विचारांचा प्रचार केला.

मानवी प्रगती व विकासाने अनेक सुखसोयी उपलब्ध झाल्या. रस्ते निर्माण झाले व दळणवळणाची साधणे उपलब्ध झाली. जगातील विविध क्षेत्रांत वेगवेगळ्या वंश व समाजांच्या लोकांचा एकमेकांशी संपर्क वाढू लागला. जलमार्ग शोधले गेले, व्यापारवृध्दी झाली व आचारविचारांचे आदानप्रदान होऊ लागले. हळूहळू अशी परिस्थिती निर्माण झाली की, ईशजीवनव्यवस्था एकाच वेळी संपूर्ण जगात अस्तित्वात आणणे शक्य वाटू लागले. संपूर्ण जगातील लोकांना जीवनाच्या उद्देशाची जाणीव करून देण्याची परिपक्क स्थिती निर्माण झाली. त्यांची जीवनाविषयी कोणती धारणा होती? अल्लाहाला काय अपेक्षित आहे? मानवाचा जन्म कशासाठी झाला आहे? मानव व त्यांच्या पालनकर्त्यामध्ये सान्निध्य कसे निर्माण करता येईल? अल्लाहास कसे प्रसन्न करता येईल? इत्यादी बाबी लोकांपुढे मांडण्याची वेळ येऊन ठेपली होती.

या कामासाठी अल्लाहाने आपला अंतिम संदेशवाहक पैगंबर मुहम्मद (स.) यांना अरबस्थानात पाठविले व त्यांच्या पश्चात प्रेषित्वाची श्रृंखला संपुष्टात आणली. पैगंबर मुहम्मद (स.) यांना मध्य-पश्चिम आशियामध्ये पाठविण्याचे असेही कारण होते की, तेथून आशिया, आफ्रिका व युरोप अगदी जवळ होते. अरबस्थान हा मध्यभागी होता. तेथून संपूर्ण जगात आपला संदेश पोहचविणे सुगम व सोपे होते. अल्लाहने पैगंबर मुहम्मद (स.) यांना इस्लामचे परिपूर्ण ज्ञान व अधिकार देऊन जगात ह्यासाठी पाठविले की आता जगाच्या अंतापर्यंत अल्लाहने अवतरित केलेला धर्म- इस्लाम जगाला जीवनाचा सरळमार्ग दाखविल.

जगात अनेक सम्राट, समाजसुधारक, धर्मसंस्थापक व क्रांतिकारी जन्माला आले, परंतु ते मानवी जीवनावर हवा तसा दीर्घकालीन प्रभाव टाकू शकले नाहीत. मात्र आम्ही जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवन व कार्याकडे कोणतेही पूर्वग्रह मनात न बाळगता लक्ष देतो, तेव्हा त्यांच्या अनुपम व्यक्तिमत्त्व व उपदेशांच्या प्रभावाने मानवाच्या व्यक्तिगत व सामुदायिक कुप्रवृत्ती व वाईट

संस्काराचा अंत झाला, असे दिसते. असंस्कृत मानव सुसंस्कृत झाला, संपूर्ण मानवसमाजात आमूलाग्र परिवर्तन घडून आले. मशीदीपासून बाजारापर्यंत, घरापासून न्यायालय व सार्वजनिक संस्थापर्यंत बदल दिसू लागला. मानवाची सर्वांगीण उन्नती घडून आली आणि नैतिकता व सदाचारावर आधारित समाजजीवनाची आधारशिला ठेवली गेली.

ज्या काळात पैगंबर मुहम्मद (स.) यांना मानवांकरिता अल्लाहाचा संदेशवाहक (पैगंबर) म्हणून पाठविण्यात आले, त्या काळात संपूर्ण जगात अज्ञान व अंधश्रध्देचा अंधकार पसरला होता. लोकांना आपल्या सृजनकर्त्या वास्तविक अल्लाहाचा विसर पडला होता. ते वाटेल त्याची पूजाअर्चा करीत होते. मानवी जीवन विभिन्न प्रकारच्या दुष्कर्मांमध्ये गुरफटले गेले होते. ऐश्वर्य व विलासी राहणीमानाने बरेच लोक मूर्खासारखे दिशाहीन जीवन जगत होते. युरोपातील लोक जीवनाच्या सुखसोयींच्या वस्तू संग्रहित करण्यात मग्न होते व भोगविलासात आपले जीवन बरबाद करीत होते. इजिप्त ते भारत, ग्रीस ते चीन सर्वत्र नैतिकतेचा ऱ्हास झाला होता. रोम व ईराणच्या प्रगत समाजाचे लोक इतरांशी क्रूर, पाशवी व हिंसक असा दुष्ट व्यवहार करीत होते. काही शासक स्वत:ला अल्लाहाचे रूप समजून लोकांना धर्मोपदेश देऊन जनतेची दिशाभूल करीत होते. जनतेची पिळवणूक केली जात होती. त्यांच्याकडून मोठा कर वसूल करीत, मजुरांकडून मोफत काम करून घेत. या भयंकर शापित दुर्दशेतून त्यांना मुक्त करणारा कोणी नव्हता.

रोम व ईराणमध्ये होणाऱ्या युध्दाने आम जनतेवर निश्चितच दुष्परिणाम घडून येत होते. ते जीवनावश्यक वस्तूपासून वंचित होत होते तरीही त्यांना असंतोष प्रगट करता येत नव्हता. मानसिक स्वास्थ्य बिघडले जात होते. जीवन अंधकारमय झाले होते. त्यांच्याकडे जीवनाचे मार्गदर्शन करण्यासाठी कोणतेच धर्म वा दार्शनिक तत्त्वज्ञान उपलब्ध नव्हते. पैगंबरांच्या उपदेशांचा लवलेशही शिल्लक राहिला नव्हता. स्वनिर्मित धर्माच्या आधारे दुष्टाचारी, स्वार्थी वृत्तीच्या अधिन होऊन लोकांची पिळवणूक व फसवणूक करीत होते. त्यांना राजाश्रय प्राप्त होता, त्यामुळे ते धर्माच्या नावाने नवनवे फतवे जारी करून लोकांच्या अज्ञानाचा गैरफायदा घेत होते. ग्रीक संस्कृती नष्ट झाली होती. एवढेच नव्हे तर ग्रीस सुधारक कन्फ्युशस व मानी यांनी निर्धारित केलेली शिकवण अस्तित्वात राहिली नव्हती. बौध्द व वैदिक धर्मही निष्प्रभ झाले होते. मानवतेला या गुंतागुतीच्या परिस्थितीतून वाट काढणे शक्य वाटत नव्हते. सारांश या सर्व परिस्थिती स्वाभाविकत: सुधारणा घडवून आणण्यासाठी एका महानतम प्रभावशाली व्यक्तीची गरज दाखवित होती, जी मानवतेचा पाठ देऊन लोकांना योग्य मार्ग दाखवू शकेल. अल्लाहने पैगंबर मुहम्मद (स.) यांना मानवजातीला मार्गदर्शन करण्याकरिता अंतिम पैगंबराच्या स्वरूपात पाठवून मानवजातीवर अनंत उपकार केले. त्यांना ज्ञान व आदर्श व्यक्तिमत्त्व प्रदान करून मानवांना अत्यंत उदात्त व कल्याणकारी जीवनमार्गदर्शक प्राप्त करून दिला. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना सोपविलेले कार्य अत्यंत परिपूर्णरित्या

पार पाडले. मायकल हार्ट यांनी आपला ग्रंथ 'द हंड्रेड'मध्ये विश्वविख्यात व्यक्तींपैकी पैगंबर मुहम्मद (स.) यांना प्रथम स्थान दिले आहे. मिस्टर हार्टच नव्हे तर जगातल्या कोणत्याही सुज्ञ मनुष्याने नि:पक्षपणे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र चरित्राचे अध्ययन केल्यास तोही याच निष्कर्षावर येईल की पैगंबर मुहम्मद (स.) हेच जगातील सर्वांसाठी श्रेष्ठ चारित्र्यवान, महान आदर्श आहेत.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनातली सर्वांत महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांनी सर्वशक्तिमान अल्लाहकडून आलेले प्रत्येक आदेश व उपदेश लोकांकडे जसेच्या तसे काहीही न लपविता पोहचविले. त्यांच्या २३ वर्षांच्या पैगंबरत्वाच्या काळात असे एकही उदाहरण मिळणार नाही की, त्यांनी ईशआज्ञेच्या पालनात दिरंगाई वा चूक केली असेल. कधीकधी असेही घडत असे की, जे काही लोकांपुढे मांडायचे असे ते पूर्णत: वातावरणाशी विसंगत व लोकांना आवडणारे नसे, तरीही ते लोकांच्या भावनात्मक प्रतिक्रियांची पर्वा न करता सत्याचा एक अंशही राखून ठेवत नसत. अरबस्थानात सर्वत्र अनेकेश्वरत्व पसरले होते व दुसऱ्या बाजूस कुरआनात एकेश्वरत्व हेच प्रमुख तत्त्व होते, ज्यानुसार एक अल्लाहशिवाय दुसरा कोणीच उपास्य नसल्याचा आग्रह होता. अनेकेश्वरवाद व मूर्तिपूजेचे केंद्रस्थान मक्का येथील लोकांना ही बाब सहन होणारी नव्हती. मक्का येथील काबासमोर उभे राहून बनलेल्या "अल्लाहशिवाय कोणीही दुसरा ईश्वर नाही" अशी घोषणा देणे खरोखर अतिशय कठीण बाब होती. मात्र साऱ्या जगाला माहीत आहे की, त्यांनी याच शब्दांत घोषणा दिली. प्रत्येक वेळी व प्रत्येक स्थळी हीच घोषणा केली आणि घोषणा अशा प्रकारे केली की, एकेश्वरवादबाबत कोणाच्याच मनात शंका शिल्लक राहिली नाही. अशाच प्रकारे अन्य ईश आदेशही त्यांनी जगापुढे निर्धास्त होऊन जसे की तसे मांडले.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र जीवनाचे आणखी एक वैशिष्ट्य असे की, त्यांनी जे जे उपदेश, तत्त्व वा आदेश लोकांपर्यंत पोहचवले त्या सर्वांवर त्यांनी स्वत: आचरण केले. त्यांनी आपल्या शब्द व कृतीत तफावत दर्शविली नाही. धार्मिक आदेशांच्या बाबतीत तसेच भक्तिमार्गात असे कधी घडले नाही की, त्यांनी त्यावर प्रथम अवलंब केला नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र जीवनात इतकी वैशिष्ट्ये आहेत की, त्या सर्वांचा येथे उल्लेख करणे शक्य नाही. या पुस्तकात त्यांच्या शक्य तितक्या महत्त्वपूर्ण कार्यांचा उल्लेख करण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. जेणेकरून मानवतेचे उपकारकर्ते पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अद्वितीय व परिपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा लोकांना जास्तीतजास्त परिचय घडेल व त्यापासून मानवांना पुरेपूर लाभ प्राप्त होईल.

- डॉ. मुहम्मद अहमद

# पैगंबर मुहम्मद (स.) यांचा कार्यकाल व तत्कालीन भारतीय समाज

'पैगंबर मुहम्मद (स.) सर्वांसाठी वैश्विक मार्गदर्शक' ही केवळ आकर्षक घोषणा व मुस्लिमांचा दावा नव्हे तर ती एक वास्तविक व्यावहारिक व ऐतिहासिक सत्यबाब आहे. ते सर्वांचेच आहेत याचा स्पष्ट अर्थ आहे. ते सार्वभौमिक, सर्वकालिक व सर्वमान्य आहेत. सार्वभौमिकतेच्या संदर्भात सांगायचे झाल्यास ते भारत-वासीयांकरिताही अल्लाहाचे पैगंबर असल्याच्या धारणेची निकड आहे की, समकालीन भारताचा विचार व्हायला हवा. त्यांच्या प्रेषित्वाचा उद्देश तसेच ईशदूतत्वाचा हेतू, संपूर्ण मानवजातीच्या व्यक्तित्वात तसेच समाजाच्या आध्यात्मिक, ऐहिक व इतर क्षेत्रांत सुधारणा, परिवर्तन, परिमार्जन व क्रांती घडवून आणणे असा होता. याच पार्श्वभूमिवर भारतीय समाजाच्या राजनैतिक, सामाजिक व धार्मिक अशा सर्व बाबींवर दृष्टिक्षेप टाकणे आवश्यक आहे.

## राजनैतिक परिस्थिती:

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अरबस्थानात इस्लामचे प्रचारकार्य इसवी सनाच्या सातव्या शतकाच्या सुरूवातीस आरंभ केले. त्या काळात भारत 'भारतवर्ष' वा 'हिंदुस्तान' नव्हता. भारतात एका शासकाचे अधिपत्य नव्हते. वेगवेगळ्या क्षेत्रांत 'पल्लव व चालुक्य' आदि वंशाच्या हर्षवर्धन, महेंद्र बर्मन व पुलकेशियन यांचे राज्य होते. यांच्यात सत्ता व शासनासाठी सतत युध्दे होत असत. पराजय झाल्यास पुनर्विजयप्राप्तीसाठी इतर देशांकडून सैनिकी साहाय्यता प्राप्त केली जात असे. सत्ताधारी वर्गाचे धर्म वा धर्मपरिवर्तनाचे आम जनतेवर परिणाम झाल्याशिवाय राहत नसत.

## धार्मिक परिस्थिती:

भारताच्या उत्तर-पश्चिम प्रांतात बौध्द धर्माचा ऱ्हास होत होता. काश्मीर ते मथुरापर्यंत तसेच मध्य, पूर्व व दक्षिण प्रांतात ब्राह्मणांचा प्रभाव वाढत होता. जैन धर्म प्रभावहीन झाला होता व जैनधर्मियांनी ब्राह्मणांशी सलोख्याचे संबंध निर्माण केले होते. एवढेच नव्हे तर त्यांचे राजनैतिक व सामाजिक प्रभुत्वही स्वीकारले होते. अनेक मोठमोठ्या जैन धर्मियांनी धर्मपरिवर्तन करण्यास सुरूवात केली होती. जैन धर्माचा अनुयायी महेंद्र वर्मन (शासनकाल इ. स. ६०० ते ६३०) याने संत अप्पर यांच्या

१. डॉ. जगदीशचंद्र जैन, साम्प्रदायवाद, पृ. ४८-४९.

सांगण्यावरून शैव धर्माचा स्वीकार केला व तो शंकराचा पुजारी झाला. त्याने महाबलीपुरम्च्या प्रसिध्द मंदिरासह अनेक शैवमंदिरांचे निर्माण केले. अशा प्रकारे जैन धर्माचे उरलेसुरले अस्तित्वही संपुष्टात आले.

दुसऱ्या बाजूस ऱ्हासोन्मुख बौध्द धर्मावर ब्राह्मणवादाचा असा प्रबळ प्रभाव पडला की बौध्द धर्माचे मूर्तिपूजाविरोधी अनुयायी मूर्तिपूजेला आपल्या धर्माचा महत्त्वाचा भाग मानू लागले. बौध्द धर्माचे अनुयायी जेथे जात तेथे गौतम बुध्दाच्या मूर्ती स्थापित करीत. खरे पाहता गौतम बुध्दाने मूर्तिपूजा न करण्याचा उपदेश दिला होता. त्या उलट त्यांच्या अनुयायानी बुद्ध मूर्ती स्थापित करून पूजाअर्चना करू लागले. एक प्रसिध्द हिंदू विद्वानाच्या (सी. वी. वैद्य यांच्या) मतानुसार, त्या काळात हिंदू धर्म व बौध्द धर्म, दोन्हीही मूर्तिपूजेचे समर्थक होते, एवढेच नव्हे तर बौध्द धर्मात हिंदू धमपिक्षाही जास्त मूर्तिपूजेचे प्रस्थ निर्माण झाले होते.

हिंदू धर्मात वेदांद्वारे स्थापित एकेश्वरत्व, ऋग्वेद काळाच्या अंतापर्यंत पोहचता पोहचता अनेक देवतावादी एकेश्वरत्वात परिवर्तीत झाला होता. काही विद्वानांनुसार, वैदिक देवतांची संख्या ३३ पर्यंत तर अन्य विद्वानांनुसार ३३३९ पर्यंत पोहचली होती. नंतर पौराणिक कालापर्यंत वाढता वाढता ३३ कोटींपर्यंत जाऊन पोहचली. हर्षवर्धनच्या काळात शिवलिंग पूजेचा सर्वत्र प्रसार झाला होता व विष्णूच्या अनेक अवतारांची पूजा प्रचलित झाली होती.

## सामाजिक परिस्थिती:

हर्षवर्धनच्या पूर्वजांनी समाजात वर्णव्यवस्था मजबूत करून उच्च-नीच, श्रेष्ठ-कनिष्ठ, स्पृश्यास्पृश्य वगैरे गोष्टींचे प्रस्थ वाढविले होते. तीच समाजव्यवस्था हर्षवर्धनाच्या काळात कायम राहिली. तत्कालीन चिनी प्रवासी फाहयान लिहितो,

"शूद्रांना समाजात काहीच महत्त्व नव्हते, त्यातल्यात्यात चांडाळांना तर अत्यंत नीच समजले जात होते. शासकीय आज्ञेनुसार, शहरात प्रवेश करताना त्यांना ढोल वाजवून लोकांना सचेत करावे लागे, जेणेकरून लोक त्यांचा स्पर्श होऊ नये म्हणून रस्त्याच्या बाजूला उभे राहत."

---

१. प्रोफेसर अल्लाहदीप - भारतीय सभ्यता हैद्राबाद विश्वविद्यालय, पृ. २०९
२. हिस्ट्री ऑफ मेडिव्हल इण्डिया, पूना, १९२१ पृ.१०१
३. भारत का इतिहास, पृ. १९२
४. भारत का इतिहास, पृ. १९२

सातव्या शतकात चीनी प्रवासी हवेनसांग भारतात आला होता. तो म्हणतो, ''शूद्रांपेक्षा निम्नस्तरावर पंचम जातीचे लोक म्हणजे कसाब, कोळी, भंगी यांच्या घरांवर वेगवेगळी चिन्हे अंकित केली जात असत व ते गावाबाहेर राहत असत. उच्चवर्णीय रस्त्यात भेटल्यास ते (शूद्र) आपल्या नजरा खाली करून डाव्या बाजूने निघून जात व द्रुतगतीने आपल्या घरात प्रवेश करीत.''

या काळात महिलांची दशा अत्यंत दयनीय होती. रोमिला थापर म्हणतात, ''उत्तर भारतात अनेक गावांत सती प्रथा जोरावर होती, तर दक्षिणेत देवदासी प्रथा वाढत होती. अनेक मंदिरांतील देवदासी निर्लज्जपणे वेश्या व्यवसाय करीत होत्या व मंदिराचे अधिकारी त्यांच्याकडून पैसे उकळत असत. ''

अन्य जीवनावश्यक वस्तूंप्रमाणे, माणसे विकली व खरेदी केली जात होती. दास-दासी प्रथा प्रचलित होती. डॉ. रोमिला थापर पुढे म्हणतात, ''पुरुष वा स्त्रिया स्वत:ला विकून टाकत असत किंवा एखादी तिसरी व्यक्ती त्यांना विकत असे. विशेषत: गरिबी वा दुष्काळग्रस्त परिस्थितीने विवश झालेले लोक मंदिरांना विकत दिले जात असत.''

भारताचे अरबांशी संबंध:

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या कार्यकालापूर्वीपासून अरबांचे भारतीयांशी व्यापारिक संबंध होते. प्रसिध्द विद्वान व संशोधक सय्यद सुलैमान नदवी म्हणतात,

''अरब व्यापारी हजारो वर्षांपासून भारताच्या समुद्र किनाऱ्याच्या भारतीय क्षेत्रात ये-जा करीत असत व तेथील विविध वस्तू इजिप्त व ओमान मार्गे युरोपापर्यंत पोहचवीत असत व तेथील वस्तू भारतीय क्षेत्रात आणत असत. याच प्रकारे इतर साहित्य-सामुग्री चीन जापानपर्यंत नेत असत.

मार्को पोलो व वास्को दि गामाच्या आगमनापर्यंत भारताचा व्यापार अरबांच्या हातात होता. भारतातून चंदन, कापूर, लवंग, जायफळ, नारळ, सुंठ, आले, ओवा, केळी, सुपारी, सुती कपडे, सुतळ व बांबूपासून तयार केलेल्या वस्तू ते अरबस्थानात नेत असत.

१. भारत का इतिहास, पृ. १९२
२. भारत का इतिहास, पृ. १९२
३. अरब और हिंदुस्थान के तअल्लुकांत (उर्दू), पृ. ३८

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या कार्यकालातही अशाच प्रकारे व्यापार होत राहिला. काही अरबांनी भारताची पूर्व किनारपट्टी व तिच्या क्षेत्रात कायमचा निवासही केला होता. भारतीयांचे अरबाशी मित्रत्वाचे संबंध होते. तत्कालीन इतिहासात त्यांच्यात कधी भांडणतंटा झाल्याचा उल्लेख नाही. पैगंबर मुहम्मद (स.) व त्यांच्या सहकाऱ्यांना भारत व भारतीयांबद्दल माहिती होती. पैगंबर मुहम्मद (स.) यांना पैगंबरत्व प्राप्त झाल्यानंतर त्यांचे संदेश भारतीयांना प्राप्त होत होते.

## भारतीय व अरब समाजातील समानता:

अरब समाजात आदरणीय मुहम्मद (स.) यांना अल्लाहने आपला संदेशवाहक (पैगंबर) म्हणून पाठविले होते, त्याच काळातील भारतीय समाजात बरेच साम्य दिसून येते. तत्कालीन भारतीय समाजातील धार्मिक व सामाजिक परिस्थितीचे संक्षिप्त वर्णन देत आहोत. या वर्णनाने पैगंबर मुहम्मद (स.) सर्वांसाठी आहेत हे सत्य सहज लक्षात येईल.

## धार्मिक समानता:

१) भारत एक धार्मिक भूमी होती. येथील लोकांचा एक अल्लाहवर विश्वास होता. ते एकच अल्लाहला सृष्टी, मानव व अन्य जीवजंतूंचा सृजनकर्ता मानत असत. हीच श्रध्दा अरबस्थानातील लोकांची होती. तेथील लोक एकेश्वरवादी होते. ते अल्लाहलाच संपूर्ण सृष्टी व सजीवांचा निर्माता मानत असत. एवढेच नव्हे तर त्यांच्या नावावरूनही (उदाहरणार्थ, अब्दुल्लाह- अल्लाहाचा दास) अशा नावांनी अल्लाह व त्यांच्यातील संबंधाबाबत काय धारणा होती, हे उघड होते.

२) अरबस्थानातील लोक अल्लाहचे इतरही सहकारी असतात, असा विश्वास करू लागले होते. ते देवदूत, किन्नर व पूर्वजांच्या मूर्तींची पूजा करीत असत. एकेकाळी एकेश्वराचे केंद्रस्थान म्हणून निर्माण केलेल्या काबागृहामध्ये तसेच त्याच्या जवळपास सुमारे ३६० मूर्ती स्थापित केल्या होत्या व ते त्यांची पूजाअर्चा करीत असत. त्यांच्या नावाने बळी देत, त्यांच्यावर नैवेद्य चढवीत व त्यांच्याकडून मदतीची प्रार्थना करीत. अशाच प्रकारे भारतीय लोक एकेश्वरासह इतर देवीदेवता, नक्षत्र, सजीव व निर्जीवांना आराध्य मानून त्यांच्यावर जबरदस्त श्रध्दा बाळगत असत.

३) वैदिक धर्माबरोबरच भारतात बौध्द व जैन धर्माचे पालन करणारे लोकही होते. याच

प्रकारे अरबस्थानात 'बहुदेववादी एकेश्वरत्व' मानणाऱ्या अनेकेश्वरवादींसह ज्यू (इस्राईली) व खिस्ती धर्माचे लोकही राहत होते.

४) भारतात अनेक तीर्थस्थाने होती व यज्ञ आयोजित करून बळी देण्याची प्रथा होती. अरबस्थानात इब्राहीम (अ.) यांनी स्थापित केलेल्या हज, उमरा व कुरबानीची प्रथा विकृत स्वरूपात अस्तित्वात होती.

सामाजिक समता

१) अरबस्थानात स्त्रियाची स्थिती चांगली नव्हती. त्यांना कामवासनेच्या पूर्ततेचे साधन मानले जात होते. समाजात त्यांना सन्मानजनक स्थान प्राप्त नव्हते. आई-वडील मुलींना किशोर अवस्थेतच ठार मारीत वा जिवंत गाडून टाकीत. भारतातसुद्धा स्त्रियांचा लैंगिक छळ केला जात असे. देवदासीच्या प्रथेमुळे बेसुमार महिलांना वेश्यागत जीवन जगावे लागत होते. धार्मिक विधीच्या नावाखाली महिलांचे शीलभंग केले जात असे.

२) भारतात समाज उच्चनीच वर्गांत विभागला गेला होता. शूद्रांची दयनीय स्थिती होती. पुरुष व महिलांचा दासदासीच्या स्वरूपात क्रयविक्रय केला जात होता. अरबस्थानात गुलामगिरीची प्रथा शिखरावर होती. पुरुष व महिलांना जीवनोपयोगी वस्तूंसमान विकले व खरेदी केले जात होते व जनावरासारखे उपयोगात आणले जात होते. गुलाम व दासींची स्थिती अत्यंत केविलवाणी होती. त्यांना पशूसारखे वागविले जात होते.

हे सर्व तत्कालीन परिस्थितीचे संक्षिप्त वर्णन आहे. अरबस्थानातील परिस्थितीत आमूलाग्र बदल घडवून आणण्याकरिता अल्लाहने आदरणीय मुहम्मद (स.) यांना सुधारक व क्रांतिकारी पैगंबर म्हणून पाठविले व त्यांनी केवळ २३ वर्षांत क्रांती घडवून आणली. ही क्रांती मानवी उध्दाराची प्रक्रिया होती जिचे १४०० वर्षांपूर्वीच्या इतिहासात दर्शन घडते. जगाच्या इतर भागांसह भारतातील कोट्यवधी लोकांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या संदेशाचा स्वीकार केला व ते अत्यंत श्रध्देने जीवन व्यतीत करीत आहेत. या पार्श्वभूमीवरून सिध्द होते की, पैगंबर मुहम्मद (स.) सर्वांचेच आहेत.

# पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळातील अरबांची स्थिती

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे पवित्र चरित्र योग्यरित्या समजून घ्यायचे असल्यास तत्कालीन अरबस्थानच्या सामाजिक, धार्मिक व राजनैतिक स्थितीबाबत माहिती करून घ्यायला हवी. अल्लाहने अनेक कारणास्तव अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांना अरबस्थानात पाठविले. एक कारण असे की, अरबस्थान जगाच्या मध्यभागी स्थित आहे व तेथून संपूर्ण जगाला सत्य संदेश सोईस्कररित्या पाठवून लोकांचे सहज मार्गदर्शन करता येत होते. पैगंबर मुहम्मद (स.) संपूर्ण जगातील लोकांना मार्गदर्शन करण्याकरिता पाठविले गेले होते. अल्लाहने स्वत: त्यांना 'संपूर्ण जगाकरिता दया व कृपा' म्हटले आहे.

'अरब' शब्दाचा शब्दश: अर्थ आहे 'जल व हिरवळरहित भूमी'. याच्या पश्चिमेस लाल समुद्र व सीना द्वीप आहे. पूर्वेस खाडी व दक्षिणेस इराकचा मोठा भूभाग आहे. उत्तरेस अरबस्थानचे वाळवंट आहे. यापैकी काही सीमांबाबत वादही आहे. याचे अंदाजे क्षेत्रफळ १० ते १३ लाख चौरस मैल आहे. अरबस्थानच्या विशेष भौगोलिक स्थितीमुळे हे क्षेत्र कलाकौशल्य, व्यापार व सांस्कृतिक आदानप्रदानाचे केंद्र बनले होते. तसेच विविध जातीजमातीचे लोक तेथे राहत होते. इतिहासकारांनी अरबांच्या तीन प्रमुख जमातींचा उल्लेख केला आहे.

१) अरब बायदा : अर्थात या जमाती ज्या पूर्णत: समाप्त झाल्या होत्या व त्यांच्या संबंधात कोणतीच माहिती उपलब्ध नाही. उदा. आद, समूद, तमस, अमालिका इत्यादी.

२) अरब आरिबा : अर्थात त्या अरब जमाती ज्या यरूब बिन मसजब बिन कहतानच्या वंशज आहेत. त्या 'कहतानी अरब' नावाने ओळखल्या जातात.

३) अरब मुस्त अरबा : अर्थात पैगंबर इस्माईल (अ.) यांच्या वंशाच्या जमाती. ते 'अदनानी अरब' म्हणून ओळखल्या जातात.

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आहे,

''अल्लाहने इब्राहीम (अ.) यांच्या संततीतून इस्माईल (अ.) यांना निवडले. नंतर इस्माईल (अ.) यांच्या संततीतून केनान यांना निवडले. केनानच्या वंशातून कुरैश

यांची निवड झाली, त्यातून बनू हाशिम यांना निवडण्यात आले व शेवटी माझी त्यांच्यातून निवड झाली.''
(हदीस : मुस्लिम, तिर्मिजी)

खरे पाहता लोक नव्या पैगंबराच्या प्रतीक्षेत होते. तत्कालीन धार्मिक पुस्तकांमध्यें पैगंबरांच्या आगमनाची पूर्वसूचना देण्यात आली होती. ज्या वेळी अरबस्थानात इस्लामचा उदय झाला, त्या काळी तेथे अनेक ज्यू (यहुदी) जमाती राहत होत्या. उल्लेखनीय कबिल्यांची (जमातींची) नावे अशी होती खैबर, नजीर, मुस्तलिक, कुरैजा, कैनकाअ हे सर्व नव्या पैगंबराची वाट बघत होते.

इस्लामच्या आगमनाच्या वेळी अरबस्थानात दोन प्रकारचे शासक होते. एक तर मुकुटधारी सम्राट, जे पूर्णत: स्वतंत्र होते व दुसरे टोळ्यांचे सरदार, ज्यांना मुकुटधारी शासकाइतकेच अधिकार प्राप्त होते. यांच्यातील बहुतेक स्वतंत्र व स्वयंभू असत. अरब आरिबात ज्या प्राचीनतम टोळीचा (समजाचा) उल्लेख मिळतो, तो 'कौमे सबा' असा आहे. या समाजाचे लोक यमनमध्ये राज्य करीत होते. ईसवी सनाच्या तिसऱ्या शतकापासून इस्लामच्या आरंभिक कालापर्यंत यमनमध्ये सतत अशांततेचे वातावरण होते. क्रांती झाली, गृहयुध्द झाले व विदेशी लोकांनी हस्तक्षेप केला. शेवटी यमन स्वातंत्र्य हिरावून बसला. कालांतराने यमनला पुन्हा स्वातंत्र्य प्राप्त झाले मात्र अशांतता कायम राहिली. या भागास नैसर्गिक प्रकोपालाही सामोरे जावे लागले.

हिजाज व सीरियामध्येही राजेशाही अस्तित्वात होती. हिजाजमध्ये धार्मिक नेतृत्व होते. मक्का हिजाज क्षेत्रात येत होता. पैगंबर इस्माईल (अ.) यांच्या काळात मक्का शहरात वसाहत झाली. ते १३७ वर्षाचे होते.

सामान्य अरबवासीयांनी पैगंबर इस्माईल (अ.) यांच्या आवाहनाने व धर्मप्रचाराने (त्यांचे वडील) इब्राहीम (अ.) यांचा धर्म स्वीकारला. ते एकेश्वरवादी होते व ते केवळ एकमेव अल्लाहाची उपासना करीत होते. मात्र कालांतराने इब्राहीम (अ.) यांच्या शिकवणीच्या काही भागाचा त्यांना विसर पडला. तरीही त्यांच्यामध्ये एकेश्वरवाद व पैगंबर इब्राहीम (अ.) यांच्या शिकवणीचा काही भाग शिल्लक राहिला. काही कालानंतर बनू खुजाआंचा सरदार अम्र बिन लुहई याचा जन्म झाला. तो अत्यंत सदाचारी, धार्मिक व दानशूर होता आणि लोक त्याचा सन्मान करीत असत. धर्मज्ञाता म्हणून त्याच्या आदेशाचे पालन करीत. त्याने सीरिया देशाचे भ्रमण

केले, तेथे त्याला लोक मूर्तीची उपासना करताना दिसून आले. त्याला ते पाहून बरे वाटले. तो म्हणाला, ''एक मूर्ती मलाही द्या, मी आमच्या देशात घेऊन जाईन. आम्हीसुध्दा तिची पूजा करू.'' लोकांनी मोठ्या आनंदाने दिलेली 'हुबल' नावाची मूर्ती मक्का येथे घेऊन आला. ती मूर्ती त्याने काबागृहात स्थापित केली व मक्कावासीयांना त्या मूर्तीची पूजा करण्यास प्रवृत्त केले. मक्कावासी तिची पूजा करू लागले. अल्पकाळातच संपूर्ण हिजाज (मक्का, मदीना व ताईफ) मध्ये मूर्तिपूजा प्रचलित झाली. काबागृहात इतर मूर्तींची स्थापना झाली. त्यात मनात व नाइला नावाच्या प्रमुख मूर्ती होत्या. या दोन्ही मूर्तीं जमजम नामक पाण्याच्या झऱ्याजवळ स्थापित करण्यात आल्या होत्या.

अम्र बिन लुहई एकदा जद्दा येथे गेला. त्याने काही भूमिगत मूर्तीं जमिनीतून काढून मक्का येथे आणल्या व त्या मूर्तींना हजच्या काळात वेगवेगळ्या अरब टोळ्यांच्या सुपूर्द करून टाकल्या. अशा प्रकारे प्रत्येक अरब टोळीकडे व प्रत्येक घरात एक मूर्ती स्थापित झाली. उज्झा, लात, मनात इत्यादि मूर्तीं अस्तित्वात आल्या. मूर्तिपूजकांनी काबागृहाला वेगवेगळ्या मूर्तींनी भरून टाकले. (मक्काविजयाच्या वेळी काबागृहात व त्या सभोवती एकूण ३६० मूर्तीं होत्या. त्या सर्वांचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वतः आपल्या पवित्र हस्ते विसर्जन करून टाकले होते.) कुरैश जमातीने काबागृहात मुजावरीचा (पुरोहिताचा) कारभार सुरू केला. याच काबागृहाची पैगंबर इब्राहीम (अ.) व इस्माईल (अ.) यांनी मोठ्या आत्मीयतेने व श्रध्देने निर्मिती केली होती. त्यांची इच्छा होती ते एकेश्वरत्वाचे केंद्र बनावे व पालनकर्त्या अल्लाहचे घर गणले जावे. मात्र नव्या पिढीने साथ दिली नाही. लोकांनी त्यास मंदिराचे (देवालयाचे) स्वरूप देऊन टाकले. एकेश्वरत्वाचे केंद्र बहुदेवत्वाचे केंद्र बनले. लोकांना इब्राहीम (अ.) यांच्या उपदेशाचा विसर पडला. एवढेच काय त्यांना या सत्याचाही विसर पडला की, काबागृहाची उभारणी एकेश्वरत्वाच्या तत्त्वावर करण्यात आली होती. मूर्तिपूजेव्यतिरिक्त इतर कोणतीच पूजा खरी असू शकत नाही, अशी त्यांची धारणा झाली होती. मूर्तिपूजक अज्ञानाने इतके ग्रस्त झाले होते की, मूर्तीकडेच आपल्या कामनापूर्तीची प्रार्थना करीत असत. मूर्तींजवळ पुजारी बनून बसत व त्यांचाच आश्रय घेत. त्यांना हाका मारून आपले दुःख निवारण करण्याची याचना करीत. त्यांना वाटे मूर्तींच्या शिफारशीने त्यांच्या कामनांची पूर्ती होईल. ते मूर्तींसाठी नैवेद्य देत, प्राण्यांचा बळी देत. जनावरांचा काबागृहाच्या दालनात तर कधी इतर ठिकाणी बळी दिला जात

असे व बळी देताना अर्थात कत्तल करताना मूर्तींच्या नावाचा उल्लेख करीत.

अंधविश्वासामुळे काही अडाणी अरबांनी काही जनावरांना विशिष्ट नावे दिली होती. ते त्यांना मूर्तींच्या नावाने मुक्त सोडून देत असत व त्यांचा आदरही करीत असत. अम्र बिन लुहई अशा प्रकारे जनावरे सोडणारा पहिला व्यक्ती होता. या जनावरांत 'बहीरा', 'सायबा', 'वसीला' व 'हाम' यांचा समावेश होता. 'सायबा'ने जन्म दिलेल्या पिलाला बहीरा म्हटले जात असे. जी सांडणी लागोपाठ दहा माद्यांना जन्म देत असे (मध्ये एकाही नरास जन्म न देता) तिला सायबा म्हटले जात असे. अशा सांडणीला स्वतंत्र सोडून दिले जात असे. तिच्यावर स्वारी केली जात नसे. तिचे केस कापले जात नसत. केवळ पाहुण्यांनाच तिचे दूध पिण्यास दिले जात असे. त्यानंतर तिच्यापासून जन्माला आलेल्या पिलांचे कान चिरून त्यांनाही मुक्त सोडून दिले जात असे. 'वसीला' त्या शेळीला म्हटले जात असे जी पाच वेळा दोन दोन शेळ्यांना (माद्या वासरांना) जन्म देत असे. (अर्थात पाच खेपांत ती दहा माद्या पिलांना जन्म देत असे.) पाच वेळी एकाही नर पिलास तिने जन्म देता कामा नये. त्या शेळीला वसीला म्हणण्याचे कारण असे की, ती साऱ्या माद्यांना एकमेकांशी जोडून देत असे. त्यानंतर तिच्यापासून जन्माला आलेल्या कोकरांचे मांस केवळ पुरुषच सेवन करू शकत होते. महिलांना त्यांचे मांस सेवन करण्याची मनाई होती. मात्र जन्मतःच मृत कोकराचे मांस स्त्री पुरुष दोघेही सेवन करू शकत असत. 'हामी' अशा उंटास म्हटले जात असे ज्याच्या वीर्यापासून लागोपाठ दहा माद्या जन्माला येत असत. एकही नर जन्माला येता कामा नये. अशा उंटावर स्वारी केली जात नसे. त्याचे केस न कापता त्यास मुक्त सोडून दिले जात असे.

अज्ञानकालातील मूर्तिपूजेच्या रीतीरिवाजाचे खंडन करण्यासाठी अल्लाहचा स्पष्ट आदेश आहे,

"अल्लाहने कोणालादेखील बहिरा ठरविले नाही अथवा सायबा किंवा वसीला आणि हाम, पण हे अश्रद्धावंत अल्लाहवर खोटे आरोप ठेवतात आणि त्यांच्यापैकी बहुतेकजण निर्बुद्ध आहेत." *(दिव्य कुरआन, ५:१०३)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लोकांना अल्लाहचा सत्य संदेश पोहचविण्यापूर्वी लोक मांत्रिक (काहिन) ज्योतिषांवर व नक्षत्रावरून भविष्यवाणी करणाऱ्यांवर विश्वास करीत असत. (काहिन म्हणजे जो भविष्यात होणाऱ्या घटनांबाबत रहस्यमय पूर्वसूचना देतो) काही मांत्रिकांचे म्हणणे होते की, एखादा

आत्मा त्यांच्या अधीन असतो जो त्यांना रहस्यमय वार्ता देत असतो. काही मांत्रिकांचा दावा होता की, त्यांना अशी शक्ती वा बुद्धी प्राप्त आहे ज्याद्वारे त्यांना रहस्यमय गोष्टींचे ज्ञान प्राप्त होते. नुजूमी (ज्योतिष) त्या व्यक्तीस म्हणतात जो नक्षत्रांच्या गती व अवस्थेची जुळवाजुळव करून येणारा काळ कसा असेल व भविष्यात कोणत्या घटना घडणार आहेत याबाबत आगाऊ सूचना देतो. या ज्योतिषाच्या भविष्यवाणीवर विश्वास ठेवणे म्हणजे नक्षत्र व ताऱ्यांवर विश्वास करणे होय. तत्कालीन अरब नक्षत्रांवर विश्वास ठेवत व अमुक अमुक नक्षत्राकडून त्यांच्यावर वर्षाव होतो अशी श्रध्दा बाळगत. एखाद्या पक्ष्याला वा हरणास उडण्यास वा पळण्यास भाग पाडत. पक्षी वा हरण उजव्या बाजूस गेल्यास त्यास शुभ चिन्ह मानून आपल्या कामाचा आरंभ करीत. जर पक्षी वा हरण डाव्या बाजूस गेले तर त्यास अपशकून समजून आपले कार्य स्थगित करीत असत. ते सशाच्या पायाचे हाड टांगून ठेवत. काही दिवसांना, महिन्यांना, जनावरांना, घरांना, स्त्रियांना ते अशुभ मानत असत. आजारांना संसर्गजन्य मानून ते आजाऱ्याला अस्पृष्य मानत. त्यांचा विश्वास होता की, मृत्यूनंतर आत्मा घुबडाचे रूप धारण करतो. त्यांची धारणा होती की, जोपर्यंत मृतकाचा बदला घेतला जात नाही तोपर्यंत त्याच्या आत्म्यास शांती मिळत नाही व त्याचा आत्मा घुबडाचे रूप धारण करून ओसाड भागात 'तृष्णा तृष्णा' किंवा 'मला पाजा, मला पाजा' असा आवाज काढत असतो. मृतकाच्या मृत्यूचा बदला घेतल्यानंतर त्याच्या आत्म्यास शांती प्राप्त होते, असे ते मानत असत.

### महिलांची दशा:

महिला मानवतेचा निम्मा भाग आहे. पुरुष मानवतेच्या एका भागाचे तर महिला मानवतेच्या दुसऱ्या भागाचे प्रतिनिधित्व करतात. आम्ही अशा समाजाची कल्पना करू शकत नाही ज्यात केवळ पुरुषच आहेत व त्या समाजास महिलांची मुळी आवश्यकताच नाही. पुरुष व महिला दोन्ही एकमेकांवर अवलंबून आहेत. स्त्री-पुरुषांच्या सामाजिक व कौटुंबिक व्यवस्थेत जर असंतुलन निर्माण होऊन वैवाहिक जीवन विस्कळित होत गेले तर समाजाच्या अध:पतनास सुरूवात होते. आपसातले संबंध बिघडल्याने त्याचे दुष्परिणाम समाजव्यवस्थेवर घडून येतात. एका बाजूस प्रगती दिसत असली तरी दुसऱ्या बाजूस अध:पतन होत असते. ही परिस्थिती समाजास विनाशकारी ठरते. इस्लामने महिलांना त्यांच्या प्रकृतीस मानवेल असे

स्थान दिले आहे. इस्लामने त्यांचा मानसन्मान वाढविला आहे. सामाजिक संतुलन कायम राखून न्यायोचित हक्क तिला बहाल केले आहेत. इस्लामच्या प्रचारापूर्वी संपूर्ण जगातील महिलांची दशा अत्यंत वाईट होती. अरब लोक स्त्रियांच्या अस्तित्वास अपमानाचे कारण समजत होते. मुलगा जन्माला आल्यास आनंदोत्सव साजरा करीत व मुलीचा जन्म झाल्यास सर्वांना दु:ख वाटत असे. कुरआनात याच भावनाचे मार्मिक चित्रीकरण केले गेले आहे,

"जेव्हा यांच्यापैकी एखाद्याला मुलीच्या जन्माची खूशखबर देण्यात येते तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर काळिमा पसरतो व तो रक्तासमान घोट गिळून बसतो. लोकांच्यापासून लपतछपत फिरतो की या वाईट बातमीनंतर कोणाला काय तोंड दाखवावयाचे, विचार करतो की अपमानीत होऊन मुलीला घेऊन राहावे अथवा मातीत गाडावे?"

*(दिव्य कुरआन, १६:५८-५९)*

अरबी लोकांमध्ये स्त्रियांकरिता सहानुभूती, प्रेम वा दयाभाव नाममात्रही नव्हता. कधीकधी तर ते मुलींना जमिनीत जिवंत गाडून टाकीत असत. इतिहास साक्ष आहे की, कैस बिन आसिमने अज्ञानकाळात आठ-दहा मुली जिवंत पुरून टाकल्या होत्या. मुलीला जीवित ठेवल्यास तिचे जगण्याचे सर्व अधिकार हिरावून घेतले जात होते. विवाहांची कोणतीच सीमा नव्हती. अरब हव्या तेवढ्या बायका बाळगत असत. गीसान शक्फी यांनी जेव्हा इस्लाम धर्म स्वीकारला तेव्हा त्याच्या दहा बायका होत्या. अशाच प्रकारे घटस्फोटवरही कोणतीच बंदी नव्हती. पुरुषाला वाटेल तेव्हा तो पत्नीला सोडचिठ्ठी देत असे. इद्दत संपण्यापूर्वी तिच्याशी विवाह केला जाई. जोपर्यंत पती हयात असे पत्नी त्याच्या अधीन असे. त्याच्या मृत्यूनंतर विधवेचा पुनर्विवाह करून दिला जात असे, कधीकधी तिला जन्मभर विधवा म्हणूनच जगावे लागत असे. सावत्र आईशी तरुण मुलगा विवाह करू शकत होता. महिलांना वारसाहक्कापासून वंचित ठेवले जात होते. एका महिलेचे अनेक पती असल्याचेही काही उदाहरणे आढळतात. आठवड्याचे व दिवसांचे असे वाटप केले जात असे की दर दिवशी तिला वेगळ्या पतीबरोबर नांदावे लागत असे. अरबांना कोणालाही आपला जावई करून घेणे आवडत नसे.

गुलामाशी जनावरांसारखे वर्तन केले जात असे. जनावरांसारखे ते

बाजारात विकले व खरेदी केले जात असत. एवढेच काय, लहानलहान बालके आपल्या आईच्या कुशीतून हिसकाऊन घेऊन विकली जात असत. माता एकीकडे तर मूल दुसरीकडे विकले जात असे. गुलामास ठार करणे अपराध मानला जात नव्हता. गुलाम महिले (दासी) शी शरीरसंबंधाची सूट होती. शरमेची बाब म्हणजे, दासीकडून देहव्यापाराद्वारे कमाई केली जात असे. अरब आपल्या दुष्कृत्यांची लाज न बाळगता दुसऱ्यांसमोर बढाई मारत असत.

अरब दारूडे होते. जुगाराची त्यांना आवड होती. जुगारात ते आपले सर्वस्व डावावर लावून टाकत व सर्वस्व हारल्यानंतर स्वत:चे जीवनही डावावर लावून संपूर्ण जीवन गुलाम म्हणून जगत.

आर्थिक दशा:

व्यापार अरब लोकांच्या उपजीविकेचे सर्वांत महत्त्वाचे साधन मात्र होते. मात्र तत्कालीन परिस्थिती व्यापारास अनुकूल नव्हती. व्यापारासाठी देशात शांती व सुरक्षेचे वातावरण हवे असते. अरबस्थानात शांती व सुरक्षेचा अभाव होता. ठराविक महिन्याव्यतिरिक्त, इतर काळात व्यापारिक हालचाल करणे शक्य नव्हते. शिल्पकारी व कलाकौशल्याच्या कामात अरब समाज संपूर्णत: मागासलेला होता. केवळ यमन व सीरिया या क्षेत्रातच कापड विणले जात असे व चामड्याची शिलाई केली जात असे. अरबस्थानच्या आंतरभागात थोडीफार शेती व बागायती उत्पादन केले जात असे. अरबांच्या स्त्रिया सूत कातण्याचे काम करीत असत मात्र सतत होणाऱ्या मारामाऱ्यांमुळे तो उद्योगही सुरक्षित नव्हता. भूक व दारिद्र्य आम बाब होती. लोकांकडे परिधान करण्यास कपडे नसत. मक्का व ताईफच्या महाजनांनी व्याजबट्ट्याच्या व्यवहाराने अरबांना कंगाल करून टाकले होते व त्यामुळे त्यांचे जगणे कठीण झाले होते.

अरबांमध्ये काही चांगली माणसेही होती. ते जे वचन देत त्याचे तंतोतंत पालन करीत. ते स्वाभिमानी होते व चांगले योध्देही होते. ते मनसोक्त पाहुणचार करीत. त्यांचे अरबी भाषेवर प्रभुत्व होते. त्यांची स्मरणशक्ती कौतुकास्पद होती.

# पैगंबर मुहम्मद (स.) यांचे पूर्वज

पैगंबर इस्माईल (अ.) यांच्या सातव्या पिढीत पैगंबर मुहम्मद (स.) यांचा जन्म झाला होता. पैगंबर इस्माईल (अ.) पैगंबर इब्राहीम (अ.) यांचे सुपुत्र होते. त्यांच्या वंशाचा चांगलाच विस्तार झाला होता. इस्माईल (अ.) यांनी जुरहुम जमातीच्या कन्येशी विवाह केला होता. जुरहुम जमातीचा अरब वंशाशी संबंध होता. कुरआनात सांगण्यात आले आहे की, पैगंबर इब्राहीम (अ.) यांनी अल्लाहच्या आदेशानुसार आपली पत्नी हाजरा व पुत्र इस्माईल यांना मक्केच्या दरीत सोडून दिले होते. त्या काळी जुरहुम जमात अस्तित्वात नव्हती.

पैगंबर इस्माईल (अ.) यांच्या संततीत अदनान यांचा जन्म झाला. अदनान यांना बरीच मुले झाली. त्यांच्यापैकी मअद बिन अदनान बरेच प्रसिध्द झाले. मअद यांचे पुत्र मुजर नावाजले गेले. त्यांच्या संततीत फिहर बिन मलिक यांनी नावलौकिक कमविला. फिहर बिन मलिक यांच्या संततीस कुरैश म्हटले जाते. पुढे त्यांच्या वंशाचे नावच कुरैश झाले. कुरैश वंशाचे सदस्य अत्यंत प्रतिष्ठित, वीर, सदाचारी, सुभाषी व धैर्यवान असल्यामुळे त्यांचा अरबस्थानात आदर केला जात असे.

फिहर यांच्या संततीत कुसई बिन किलाब यांचा जन्म झाला. जुरहुम जमातीचे लोक मक्का शहराचे सरदार होते. काबागृहाचे संरक्षक खुजाआ हे बरेच प्रभावशाली मानले जाऊ लागले. त्यानंतर कुसई यांच्या कर्तबगारी व सद्‌गुणाचा विचार करता काबागृहाची व्यवस्था त्यांच्याकडे सोपविण्यात आली. काबागृहाची देखरेख व सुरक्षेची जबाबदारी त्यांच्याकडे होती. काबागृहाची किल्लीही त्यांच्याच हातात देण्यात आली होती. त्यांच्या परवानगीशिवाय कोणीही काबागृहात प्रवेश करू शकत नव्हता. अशा प्रकारे कुसई हे लोकप्रिय सरदार सिध्द झाले.

त्या काळापर्यंत मक्का क्षेत्रात एकही इमारत नव्हती. काबागृहापेक्षा उंच इमारत निर्माण करण्याची कोणाचीच हिंमत होत नव्हती. कुसईने 'दारून्नदवा' (यंत्रणागृह) नावाची एक इमारत उभारली. तेथे लोकांना एकत्र केले जात असे. त्यांच्या समस्यांवर विचार विनिमय केला जात होता. महत्त्वपूर्ण मुद्यांवर त्यांच्याशी सल्लामसलत केली जात होती. तेथेच वेगवेगळ्या वादग्रस्त प्रकरणांवर न्यायिक प्रक्रिया करून निर्णय दिला जात असे. तसेच विवाहही जुळविले जात असत.

कुसई यांचे पुत्र अब्द मुनाफ हे प्रतिष्ठित व्यक्ती मानले गेले. त्यांचे ज्येष्ठ पुत्र हाशिम यांच्याकडे सिकाया [१] व रिफादा [२] विभागाची व्यवस्था सोपविण्यात आली होती. अब्द मनाफ, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आजोबा अब्दुल मुत्तलिब यांचे आजोबा होते. अब्दुल मुत्तलिब यांना 'सिकाया' व 'रिफादा'च्या व्यवस्थेची जबाबदारी त्यांचे काका मुत्तलिब बिन अब्द मनाफ यांच्याकडून प्राप्त झाली होती. अब्दुल मुत्तलिब यांना समाजात प्रतिष्ठा व मान सन्मान प्राप्त होता.

कुरैश वंशीयांना विश्वास होता की, काबागृहावर अल्लाहची विशिष्ट कृपा आहे व त्याचे संरक्षण करणारा तोच आहे. हब्शाचा सम्राट अबरहाने काबागृहावर जबरदस्त सैनिक हल्ला केला होता. मात्र अबरहाला पराजय पत्करावा लागला होता. या घटनेने काबागृहाचे महत्त्व उंचावले गेले.

अब्दुल मुत्तलिब यांना दहा पुत्र व सहा कन्या होत्या. अब्दुल्लाह सर्वांत अधिक सुंदर व चारित्र्यवान होते. त्यांना जबीह संबोधिले जात होते. जेव्हा त्यांच्या वडिलांनी नवसाची फेड करण्यासाठी पासा टाकला. त्यात अब्दुल्लाह यांचा बळी द्यावा असा इशारा मिळाला. अब्दुल मुत्तलिब यांनी त्यांचा हात धरला व त्यांचा बळी देण्यासाठी काबागृहाजवळ गेले. परंतु कुरैश समाजाने त्यांची समजूत घातली व अब्दुल्लाह व दहा उंटांवर पासा टाकण्यात आला. पुन्हा अब्दुल्लाह यांचेच नाव आले. नंतर उंटांची संख्या दहा दहाने वाढविण्यात आली. जेंव्हा उंटांची संख्या शंभरावर पोहचली तेंव्हा पासा उंटांच्या नावावर पडला. उंटांचा बळी देण्यात आला. मुहम्मद (स.) म्हणत असत, "मी तर दोन जबीहां (बळीं) ची संतान आहे, एक पैगंबर इस्माईल (अ.) व दुसरे अब्दुल्लाह."

अब्दुल मुत्तलिब यांनी अब्दुल्लाह यांचा विवाह आमिना यांच्याशी लावला. त्या आपल्या माहेरहून अब्दुल्लाह यांच्या घरी आल्या. परंतु थोड्याच दिवसांनंतर अब्दुल्लाह यांचा मदीना येथे मृत्यू झाला. ते तेथे आपल्या वडिलांच्या आदेशाने खजूर आणण्यासाठी गेले होते. अब्दुल्लाह यांच्या देहान्ताच्या वेळी आमिना गर्भवती होत्या.

---

१. पिण्याच्या पाण्याची व्यवस्था.

२. कुरैशद्वारा निर्धारित एक वार्षिक धनराशी जिचा मीना व मक्का येथे हाजी लोकांच्या सत्कारासाठी खर्च केला जात होता.

# जन्म व जीवनाच्या सुरूवातीची चाळीस वर्षे

मानवांचे उपकारकर्ते पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जन्माचा सर्वांत पवित्र व तेजस्वी दिवस उगवला. दिनांक १२ रबीउल अव्वल सोमवार अर्थात इसवी सन अनुसार ३० एप्रिल ५७१ रोजी मक्का येथे त्यांचा जन्म झाला. त्यांच्या आगमनाने अंधकार व संकटग्रस्त विश्वात सत्याच्या प्रकाशाचे तेज पसरले गेले. त्यांच्या जन्माने जग तेजोमय झाले. त्यांचे आजोबा अब्दुल मुत्तलिब त्यांना घेऊन काबागृहात गेले व त्यांच्याकरिता प्रार्थना करीत राहिले. आजोबांनी उदात्त स्वप्नाच्या प्रकाशात त्यांचे नाव मुहम्मद ठेवले. ते म्हणाले, ''माझा नातू प्रशंसा प्राप्त करो अशी माझी इच्छा आहे.'' त्यांच्या आईने एका शुभ स्वप्नाच्या प्रभावात त्यांचे नाव [१] 'अहमद' ठेवले. मुहम्मद हे नवीनच नाव होते, त्यामुळे अरबांना खूपच आश्चर्य वाटले. जन्माच्या सातव्या दिवशी आजोबांनी उंटाचा बळी दिला व सर्व कुरैशांना आमंत्रित केले. भोजन समारंभ संपल्यानंतर एका व्यक्तीने विचारले,

''अब्दुल मुत्तलिब, आपण आपल्या नातवाचे नाव मुहम्मद का ठेवले? कौटुंबिक नाव का निवडले नाही?'' अब्दुल मुत्तलिब यांनी उत्तर दिले,

''माझी इच्छा होती की, आकाशात त्याची प्रशंसा व्हावी, धरतीवरसुध्दा तो पालनकर्त्याला व लोकांनाही प्रिय वाटावा.''

कुरैश या प्रतिष्ठित घराण्यातील स्त्रिया त्या काळी आपल्या मुलांना स्वतः स्तनपान करीत नव्हत्या. जवळपासच्या गावातील आयांचा घोळका येई व तान्ह्या मुलांना आपल्या सोबत गावी घेऊन जाई. त्यांना दूध पाजत व त्यांची जोपासना करीत. मोठे झाल्यानंतर त्यांना आईवडिलांच्या स्वाधीन करीत. त्यामुळे मुलं सशक्त होत. त्यांना अरबी भाषाही अवगत होत असे. (अशा दूध पाजणाऱ्या व बालकांचे पालनपोषण करणाऱ्या 'आया' वर्षातील ठराविक काळात मक्केत येत असत.) त्यांचा येण्याचा हंगाम निश्चित होता. दोन-तीन दिवस आया न मिळाल्यामुळे आमिना यांनी दूध पाजले. नंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांना अब्दुल्लाह यांचे भाऊ अबू लहब यांची दासी सौबियाच्या स्वाधीन करण्यात आले व जोपर्यंत आया मिळत नाही तोपर्यंत दूध पाजण्याची जबाबदारी सोपविण्यात आली. काही दिवसांतच बनी सअद जमातीच्या आयांचा घोळका आला. या आया शिशुपालनाच्या कामात निष्णात होत्या असे मानले

१. आमिना यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जन्मापूर्वी बऱ्याचशा खुणा व चिन्हे दिसून आली, ज्यावरून त्यांच्या लक्षात आले की, त्यांचा पुत्र भविष्यात फार महान व प्रतिष्ठावान होणार आहे.

जात होते. त्या घोळक्यात हलिमा सादिया नावाची महिलाही होती.

त्या काळी पडलेल्या दुष्काळामुळे लोक त्रस्त झाले होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांना या आयांसमोर ठेवण्यात आले. मात्र ते अनाथ असल्यामुळे व बक्षिसाची आशा नसल्याने आयांनी त्यांचा स्वीकार केला नाही. हलीमा फार कमकुवत व सडपातळ होती. तिनेही सुरूवातीला त्यांच्याकडे लक्ष न देता दुसरे मूल शोधण्याचा प्रयत्न केला.

हलीमाचा पती तिच्यासोबत आला होता. हलीमाने त्याला म्हटले, ''मला लाज वाटते. इतर सर्व सोबती बायांकडे मूल आहे मात्र माझ्या कुशीत मूल नाही. मी जाते व त्या अनाथ बालकाचा स्वीकार करते. रिक्तहस्ते परत जाण्यापेक्षा अनाथ मुलाला घेऊन जाणे योग्य ठरेल.'' पतीने म्हटले, ''जा, घेऊन ये, काय हरकत आहे? अल्लाह त्यातच आमचा उध्दार करील.''

तिने पैगंबर मुहम्मद (स.) यांचा स्वीकार केला व आयांच्या तांड्यात सामील झाली. त्या सर्वांनी उघड डोळ्यांनी चमत्कार पाहिला. दुधात, जनावरांत, खाण्यापिण्यांत; सारांश सर्वच बाबतीत वाढ झाल्याचे निदर्शनास आले. सर्व आया एकमुखाने बोलू लागल्या, ''हलीमा तुला मिळालेले मूल भाग्यवान आहे !''

अल्लाहकृपेचा वर्षाव सुरू राहिला. बोलता बोलता दोन वर्षे निघून गेली. हलीमाने दूध पाजणे बंद केले व बालकाला आमिना यांच्याकडे परत घेऊन आली. हलीमाने विनंती केली की, बालकाला थोडे दिवस तिच्याचकडे राहू द्यावे. आमिनाने विनंती मान्य करून बालकाला तिच्यासोबत परत पाठवून दिले. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे पालनपोषण गावाच्या स्वच्छ व खुल्या वातावरणात होत राहिले.

जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) सहा वर्षाचे झाले तेव्हा आपल्या मातेसोबत ते यसरब (मदीना) येथे गेले. आमिना यांना त्यांचे पती अब्दुल्लाह यांच्या थडग्याचे (कबर) दर्शन घ्यावयाची इच्छा होती. मदीनाहून एक महिन्यानंतर परत येताना 'अबवा' या स्थानी आमिना यांचा मृत्यू झाला व त्यांना तेथेच दफन करण्यात आले.

एका बाजूस आईच्या मृत्यूचे दु:ख दुसऱ्या बाजूस एकटे पडल्याची चिंता. आई जीवंत होती तेव्हाही पितृहीन अनाथ होण्याचे दु:ख होते. आईच्या मृत्यूने त्यांच्या मनावर काय बेतले असेल ते त्यांनाच ठाऊक. दु:खांची रांग लागली होती. हबश येथे राहणाऱ्या उम्मे ऐमन वरका त्यांना घेऊन मक्का येथे आल्या व त्यांना त्यांचे आजोबा अब्दुल मुत्तलिब यांच्या सुपूर्द केले.

अब्दुल मुत्तलिब अरबांचे सरदार होते. ते मुहम्मद (स.) यांच्यावर प्रेमाचा वर्षाव करीत. त्यांना दिलासा देत. स्वत:च्या मुलांच्या जीवापेक्षा जास्त त्यांची चिंता

बाळगत असत. ते काबागृहाच्या आवारात बसून त्यांच्या पाठीवर हात फिरवीत असत. मुहम्मद (स.) आठ वर्षाचे झाले व अचानक अब्दुल मुत्तलिब यांचे निधन झाले. आजोबांचा मृत्यू त्यांच्याकरिता जबरदस्त धक्का होता. आईवडिलांपेक्षाही जास्त आजोबांच्या मृत्यूने त्यांना दु:ख झाले. ही अल्लाहची मर्जी होती की एका पाठोपाठ एक दु:खाचे धक्के देऊन त्यांना निराधार करून त्यांना कठीण व महानतम कार्यासाठी सज्ज करावयाचे होते.

चुलते अबू तालिब यांच्या सान्निध्यात :

मुहम्मद (स.) यांच्या आजोबांनी मृत्युपूर्वी त्यांना अबू तालिब यांच्याकडे सुपुर्द केले होते. अबू तालिब यांना त्यांच्या वडिलांनी मुहम्मद (स.) यांचे पालनपोषण करण्याबाबत व योग्य ती काळजी घेण्याची समज दिली होती. अबू तालिब त्यांच्या वडिलांचे सख्खे भाऊ होते. त्यांनी आपल्या पुतण्याचे उत्तमरित्या पालनपोषण केले. त्यांनी त्यांना स्वत:चे पुत्र अली, जाफर व अकील यांच्यापेक्षा जास्त प्रेमाने वागविले. ४० वर्षापेक्षा अधिक काळापर्यंत त्यांनी मुहम्मद (स.) यांना संरक्षण दिले व त्यांना पाठिंबा देत राहिले.

मुहम्मद (स.) १२ वर्षाचे असताना त्यांचे चुलते अबू तालिब सीरियाकडे व्यापाराच्या निमित्ताने प्रवासासाठी निघाले. मुहम्मद (स.) यांनाही सोबत घेतले होते.

त्यांचा तांडा लांबचा प्रवास करून बसरा पोहचला. तेथे जरजीस नावाचा एक सन्यासी (राहिब) राहत होता. त्याला बुहैरा नावाने लोक ओळखत असत. तो चर्चच्या बाहेर पडत नसे. मात्र त्या दिवशी तो चर्च बाहेर पडला व अबू तालिब व त्यांच्या सहप्रवाशांचे स्वागत व आदरातिथ्य केले. त्याने मुहम्मद (स.) यांच्या शुभ लक्षणांकडे पाहून त्यांना म्हटले,

"हे विश्वनायक आहेत. यांना अल्लाहाने संपूर्ण जगाकरिता दयानिधी (रहमतुल्लिल आलमीन) म्हणून पाठविले आहे."

बुहैरा याने मुहम्मद (स.) यांच्या सुप्तावस्थेत असलेल्या पैगंबरत्वाच्या गुणांची अबू तालिब यांना जाणीव करून दिली व म्हटले, "आपल्या पुतण्याला परत मायदेशी घेऊन जा. त्यांची यहूदकडून सुरक्षा करा, कारण तुमचे पुतणे भविष्यात महान व्यक्ती होणार आहेत." अबू तालिब, मुहम्मद (स.) यांना सुरक्षितपणे मक्का येथे परत घेऊन आले.

# विशेष पालनपोषण

सर्वश्रेष्ठ अल्लाह ज्याची आपल्या पवित्र कामाकरिता निवड करतो त्याच्या संपूर्ण जीवनास पवित्र, कलंकरहित व शुध्द आचारविचाराने परिपूर्ण करतो. मुहम्मद (स.) यांना भविष्यात पैगंबरत्व प्रदान करावयाचे होते म्हणून त्यांचे चारित्र्य अत्यंत शुध्द, पवित्र व निष्कलंक असणे आवश्यक होते. त्यांचे नैतिक जीवन व आचारविचार उच्चकोटीचे होते. अल्लाहने त्यांना अज्ञान व दुराचारापासून अलिप्त ठेवले होते.

बाल्यावस्था सहसा खेळ व मौजमजेचा काळ असतो, मात्र मुहम्मद (स.) खेळ व मौजमजेपासून नेहमीच दूर राहिले. निरर्थक व निरूपयोगी कामांत त्यांना रुचि नव्हती. त्यांना सदैव सत्याचा शोध घेण्याची आवड होती. ते सतत काहीतरी मार्गदर्शक तत्त्वाच्या शोधात असत. त्यांना अशा चिन्हांची जिज्ञासा होती ज्याने त्यांना सत्याचे ज्ञान घडू शकेल.

ते कधीकधी एकाग्रचित्ताने सर्व गोष्टींचा विचार करीत. जी गोष्ट लक्षात येत असे तिला मन:पटलावर कोरून घेत. जी गोष्ट चुकीची व वाईट वाटे तिच्यापासून ते अलिप्त राहत. याच प्रकारच्या धुंद मन:स्थितीत त्यांचा वेळ जात असे.

बारा वर्षाचे असताना ते काही आपल्या जमातीच्या व काही इतरांच्या शेळ्या घेऊन दूर मैदानाकडे निघून जात. शेळ्यांना स्वतंत्रपणे चरायला सोडून देत. तेथील शांत व आनंदमय वातावरणात त्यांना आत्मिक सुख प्राप्त होत असे. समोर विशाल मैदानाकडे पाहून ते विचारमग्न होत व चिंतन मनन करू लागत. चारी बाजूंना पसरलेले नैसर्गिक वैभव त्यांना अल्लाहचे उघडे पुस्तक वाटत असे. ते त्याचे अध्ययन करून त्यातून ज्ञान प्राप्त करीत असत.

ते सुरूवातीपासूनच आपल्या समाजा (जमाती) तील सर्वांत अधिक सज्जन, सदाचारी, सुशील, सत्यवादी व विश्वासू व्यक्ती मानले जात होते. लोक त्यांना 'अमीन' या नावाने संबोधित असत. ते नातेवाईकांचा आदर करीत, लोकांना मदत करीत व त्यांच्या गरजा पूर्ण करीत, लोकांचा पाहुणचार करीत, चांगल्या कामात सहकार्य करीत, काबाडकष्ट करून कमाई करीत व थोड्याथोडक्यात संतोष मानीत असत.

पावित्र्य, उदारता व शालीनता त्यांच्या स्वभावाची वैशिष्ट्ये होती. लहानपणाची एक गोष्ट आहे. काबागृहाच्या भिंतीची दुरुस्ती केली जात होती. मोठ्यांबरोबर लहान मुलेही कामात हातभार लावत होती. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत त्यांचे काका अब्बाससुद्धा त्यात सामील होते. मुलांनी आपले 'तहबंद' (लुंगी, अंगावरील वस्त्र) काढून त्यावरच दगड ठेवून आणत होते. माननीय अब्बास

यांनी मुहम्मद (स.) यांनासुद्धा अंगावरील कपडे काढून खांद्यावर ठेवण्यास सांगितले, जेणेकरून असे केल्याने दगडाने जखम होणार नाही. अरबस्थानात त्या काळी ही काही नवी बाब नव्हती. त्यांनीही कपडे काढले, पण लगेच आपण वस्त्रहीन झालोय या जाणीवेने ते मूर्छित झाले. शुध्दीवर येताच "माझे वस्त्र, माझे वस्त्र" असे उद्‌गार त्यांच्या मुखातून बाहेर पडले. लोकांनी लगेच त्यांचे वस्त्र त्यांच्या अंगावर टाकले, तेंव्हा कुठे त्यांना बरे वाटले.

त्यांनी किशोरवयात धनुर्विद्या प्राप्त केली होती. तारुण्यात सैनिक प्रशिक्षणात प्राविण्य प्राप्त केले. त्यांनी आपल्या काकांबरोबर फुज्जायुध्दात भाग घेतला. हे युध्द कुरैश व हवाजिन यांच्यात झाले होते. युध्द अतिभयानक विनाशकारी मात्र ऐतिहासिक होते. अरब धरतीवर इतके भयंकर युध्द कधी झाले नव्हते. अनेक वर्षे युध्द होत राहिले. या युध्दात मुहम्मद (स.) सामील होते, मात्र त्यांनी कोणावरच शस्त्र उगारले नाही. शेवटी दोन्ही पक्षांत करार झाला. हा करार 'हिल्फुल फुजूल' नावाने प्रसिध्द झाला. या करारात मुहम्मद (स.) देखील सामील होते. करारात खालील मुद्दे मान्य करण्यात आले.

१) देशात शांतता स्थापित केली जाईल.
२) प्रवाशांचे रक्षण केले जाईल.
३) दीनदुबळ्यांना मदत करण्यात येईल.
४) त्रस्त (अत्याचारित) लोकांना पाठिंबा दिला जाईल.
५) जुलमी व अन्याय करणाऱ्यास मक्केत राहू दिले जाणार नाही.

मुहम्मद (स.) हे कुशल मार्गदर्शक होते व नेतृत्वाचे अद्वितीय गुण त्यांच्यात विद्यमान होते. याचा अंदाज खालील घटनेवरून करता येईल.

काबागृहाचे नवनिर्माण होत होते. हजरे अस्वद (काळा दगड) लावण्यावरून अरबांमध्ये वाद निर्माण झाला. प्रत्येक अरब-जमात दगड उचलण्याचा हट्ट करीत होती. बाचाबाची करताकरता काही लोकांनी म्यानातून तलवारी उपसल्या. सर्वच लोक उत्तेजित झाल्यामुळे वातावरण तंग झाले होते. मुहम्मद (स.) यांनी सर्वांना विश्वासात घेऊन एक योजना सर्वांसमोर मांडली. त्यांनी एक चादर पसरली व दगड मध्यभागी ठेवून सर्व जमातींच्या सरदारांना चादर उचलून धरण्याचे आवाहन केले. सर्वांनी चादर उचलली व योग्य त्या ठिकाणी नेली. मुहम्मद (स.) यांनी हजरे अस्वद उचलून ठरल्या ठिकाणी लावून टाकला. विवाद संपला - कार्य सिध्द झाले. सर्वांना आनंद झाला.

## माननीय खदीजा (रजि.) यांच्याशी विवाह

काबागृहापासून मिळणाऱ्या उत्पन्नावर पैगंबर मुहम्मद (स.) आपली उपजीविका चालवू शकले असते, पण त्यांनी व्यापाराकडे आपले लक्ष केंद्रित केले. त्यांच्याजवळ भांडवल नव्हते. ते दुसऱ्याच्या भांडवलावर व्यापार करीत राहिले. त्यांनी दोन वेळा सीरियाची व्यापारिक यात्रा केली. साईब, कैस बिन साईब मख्जूमी व खदीजा (रजि.) यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या व्यापारिक प्रामाणिकतेचा चांगलाच अनुभव आला. सर्वजण त्यांना 'विश्वासपात्र व्यापारी' असे संबोधू लागले. विशेषतः माननीय खदीजा (रजि.) यांना विश्वास, पात्रता व प्रामाणिकतेबरोबरच व्यापारात वृध्दी होत असल्याचे निदर्शनास आले. त्या पुण्यवान महिलेच्या मनात त्यांच्याविषयी आकर्षण वाढत गेले.

खदीजा (रजि.) व्यापार करीत होत्या. त्यांच्या भांडवलाच्या आधारे इतर लोक व्यापार करून मोबदला प्राप्त करीत. पैगंबर मुहम्मद (स.) खदीजा (रजि.) यांचा माल घेऊन सीरियाला गेले होते. या प्रवासात जे चमत्कार घडले त्याचा तपशील माननीय खदीजा (रजि.) यांना मिळाला. खदीजा (रजि.) यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या प्रामाणिकता व सदाचाराबाबत माहिती मिळालेलीच होती. त्या दोन वेळा विधवा झाल्या होत्या. त्यांचे दुसरे पती अबू हाला यांचा मृत्यू झाला होता. त्यांनी मुहम्मद (स.) यांच्याशी विवाहाची इच्छा प्रदर्शित केली. त्या वेळी त्यांचे वय ४० वर्ष होते व पैगंबर मुहम्मद (स.) हे २५ वर्षाचे होते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचा खदीजा यांच्याशी विवाह झाला. अबू तालिब यांनी त्यांच्या विवाहाचे संचालन केले. त्यांनी अल्लाहचे स्तवन केले व म्हटले, "मुहम्मद (स.) हा माझे बंधू अब्दुल्लाह यांचा पुत्र आहे. कुरैश जमातीत त्याच्यासारखा अन्य युवक नाही. त्याच्याजवळ धनदौलत नाही. धनदौलत तर ये-जा करणारी सावली आहे. मुहम्मद (स.) माझा पुतण्या आहे. तो खुवैलिदची मुलगी खदीजाशी निकाह करू इच्छितो व माझ्या संपत्तीतून वीस उंट त्यांच्या निकाहाकरिता स्त्रीधन (मेहर) निश्चित करण्यात आले आहे. अल्लाहची शपथ, त्यांचे भविष्य अत्यंत उज्वल होईल."

अशा प्रकारे त्यांच्या वैवाहिक जीवनाचा शुभारंभ झाला.

# आदरणीय मुहम्मद (स.) पैगंबर झाले!

आदरणीय मुहम्मद (स.) वयाच्या चाळीस वर्षापर्यंत पोहचता पोहचता एकांतप्रिय होत गेले. सतत चिंतन व विचारमग्न राहिल्यामुळे सामान्य माणसापेक्षा त्यांचे वैचारिक व बौध्दिक स्तर बरेच उंचावले गेले. ते शिदोरी व पाणी घेऊन मक्कापासून सहा मैल अंतरावरील हिरा नावाच्या गुफेत जाऊन दीर्घकाळापर्यंत मुक्काम करीत. गुफा १२ फूट लांब पाच फूट रूंद होती. गुफेत पैगंबर इब्राहीम (अ.) यांच्या शिकवणुकीनुसार अल्लाहची उपासना करण्यात व्यस्त राहत. ते सत्य जाणून घेऊ इच्छित होते. त्यांना जे ज्ञान प्राप्त करावयाचे होते त्याकरिता अहर्निश प्रयत्न करीत होते.

रमजान महिना ते गुफेतच व्यतीत करीत. अल्लाहच्या आराधनेत ध्यानस्थ राहत. मक्केत परतताच प्रथम काबागृहाकडे जात. काबागृहाची प्रदक्षिणा करीत, मग घरी जात. त्यांची मुले त्यांच्याजवळ येताच ते त्यांना उचलून घेत. त्यांच्याशी अत्यंत प्रेमाने गोड गोड गोष्टी करीत. अल्पकाळातच त्यांच्या मुलांचा मृत्यू झाला. कासिम, तय्यब व ताहिर तिघांना देवाज्ञा (मृत्यू) झाली. त्यांच्या केवळ चार मुली जैनब, रुकय्या, उम्मे कुलसुम व फातिमा हयात राहिल्या. ते सतत दु:ख सहन करीत राहिले. लहानपणीच अनाथ झाले होते. विवाहोत्तर त्यांनी आपले प्रिय पुत्र गमावले.

एक दिवस ते हिरा या गुफेत अल्लाहचे चिंतन करीत होते. रमजान महिना होता. सकाळची वेळ होती. अचानक एका ईशदूताचे (फरिश्त्याचे) दर्शन घडले. फरिश्त्याचे नाव होते जिब्रिल (अ.) (मानवाप्रमाणेच फरिश्त्यांची अल्लाहनेच निर्मिती केली असून ते सतत अल्लाहची उपासना करीत असतात व त्याचेच नामस्मरण करीत असतात.) आदरणीय जिब्रिल (अ.) यांनी आदरणीय मुहम्मद (स.) यांना संबोधिले,

"मुहम्मद! शुभवार्तेचा स्वीकार करा, आपण अल्लाहचे रसूल (पैगंबर) आहात व मी जिब्रिल आहे. वाचा, अल्लाहच्या नावाने!"

पैगंबर मुहम्मद म्हणाले, "मला वाचता येत नाही." हे ऐकल्यानंतर आदरणीय जिब्रिल (अ.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना कडकडून आलिंगन दिले व पुन्हा म्हटले, "वाचा" मुहम्मद (स.) यांनी पुन्हा तेच उत्तर दिले, आदरणीय जिब्रिल (अ.) यांनी पुन्हा आलिंगन दिले. आलिंगन इतके कडकडून दिले होते की ते मुहम्मद (स.) यांच्या सहनशक्तीच्या बाहेर होते.

आदरणीय जिब्रिल (अ.) यांनी कुरआनच्या सूरह अलकचे पठण सुरू केले. पैगंबर मुहम्मद (स.) ही सोबत पठण करू लागले.

"आपल्या पालनकर्त्याच्या नावाने पठण कर, ज्याने (सर्व काही) निर्माण केले आहे. मनुष्याला गोठलेल्या रक्तापासून निर्माण केले. वाच, तुझा पालनकर्ता फार

ती जिने मजुराला कामावर लावले, काम करून घेतले व नंतर तिला मजुरी दिली नाही.''  (हदीस : बुखारी, इब्ने माजा, अहमद)

विधवा व गरिबांना मदत :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की, विधवा व गरिबांना मदत करणारा, अल्लाहच्या मार्गावर (जिहाद व अल्लाहच्या दीन (धर्म) चा प्रसार करून त्यास स्थापित करण्यासाठी) कष्ट करणाऱ्यासमान आहे.

असे समजते की पैगंबर मुहम्मद (स.) म्हणत असत की, ''त्या व्यक्तीचे स्थान असे आहे जसे एखादी व्यक्ती अल्लाहच्या आराधनेत आळस न करता जागरण करते व रोजापालन करण्यातही हयगय करीत नाही.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

लोकांशी सदाचाराचे वर्तन :

कुरआनात म्हटले आहे,

''तुम्ही सर्वजण अल्लाहची भक्ती करा, त्याच्यासमवेत कोणाला भागीदार बनवू नका, आईवडिलांशी नेक वर्तणूक ठेवा, नातेवाईक आणि अनाथ व गोरगरीबांशी चांगला व्यवहार करा.''

अनाथांची सेवा :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''जो मनुष्य आपल्या व इतरांच्या अनाथांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करील तो आणि मी स्वर्गात असे (इतक्याजवळ) राहू जसे अंगठा व लगतच्या दोन बोटांत जवळीक असते.''  (हदीस : बुखारी)

आईवडिलांची सेवा :

कुरआनात म्हटले आहे,

''व आम्ही लोकांना आपल्या आईवडिलांशी चांगल्या प्रकारे वागण्याचे उपदेश दिले आहेत.''

१) माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे,

एक व्यक्ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आली व म्हणली, ''हे अल्लाहचे पैगंबरा! अशी कोणती व्यक्ती आहे जिला माझ्याकडून चांगल्या व्यवहाराचा व सहकार्याचा सर्वांत अधिक अधिकार आहे?''

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''तुझी आई.''

त्यांनी विचारले, ''तिच्यानंतर?'' पैगंबर (स.) म्हणाले, ''तुझी आई.''

त्यांनी विचारले, ''तिच्यानंतर?'' पैगंबर (स.) म्हणाले, ''तुझी आई.''

त्यांनी पुन्हा विचारले, ''तिच्यानंतर?''

पैगंबर (स.) म्हणाले, ''तुझे पिता.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

''धूळ-माती जाओ त्याच्या नाकात.'' पुन्हा म्हटले, ''धूळ-माती जाओ त्याच्या नाकात.'' (अर्थात त्याचा अपमान होओ) ज्याने आपल्या आईवडिलांच्या वार्धक्यकाळात, एकाची व दोघांची (सेवा करून) स्वर्गात प्रवेश मिळविला नाही.'' (हदीस : मुस्लिम)

३. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''सर्वांत जास्त पुण्याईचे कार्य हे आहे की मनुष्याने आपल्या वडिलांच्या (मृत्यु) नंतर वडिलांच्या मित्रांचे हक्क अदा करावेत.'' (हदीस : मुस्लिम)

नातेवाईकांशी सद्‌वर्तन :

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

''तुमच्यात सर्वांत चांगला माणूस तो आहे जो घरातील लोकांशी चांगल्या प्रकारे वागतो.'' व ते म्हणाले, ''मी माझ्या घरातील लोकांशी तुम्हा सर्वांपेक्षा अधिक चांगले वर्तन करतो.'' (हदीस : तिर्मिजी, दारमी, इब्ने माजा)

पतिव्रता पत्नी :

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''जगातल्या सर्व वस्तू अल्पावधीत नष्ट होणार आहेत व त्यात सर्वाधिक चांगली वस्तू आहे पतिव्रता पत्नी.''

शेजाऱ्यांशी सद्व्यवहार :

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"अल्लाहची शपथ तो मुस्लिम (मोमिन) नाही, अल्लाहची शपथ तो मुस्लिम नाही, अल्लाह शपथ तो मुस्लिम नाही." लोकांनी विचारले, "कोण मुस्लिम नाहीं?" प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले "तो, ज्याचा शेजारी त्याच्या दुर्व्यव्हरापासून सुरक्षित राहत नसेल." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

दया :

१. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"अल्लाह त्या माणसावर दया करीत नाही जो लोकांवर दया करीत नाही." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"दया करणाऱ्यांवर दयावान (अल्लाह) दया करेल. जमिनीवर राहणाऱ्यांवर दया करा, आकाशातून तो तुमच्यावर दया करील."

(हदीस : अबू दाऊद, तिर्मिजी)

दुष्कर्म :

१. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"मोठे पाप हे आहे की अल्लाहचा कोणी भागीदार आहे असे मानणे, आईवडिलांच्या आज्ञांचे पालन न करणे, सजीवांची कत्तल करणे व खोटी साक्ष देणे." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात,

"सात घातक व विनाशक दुष्कर्मांपासून अलिप्त राहा." त्यांच्या सहकाऱ्यांनी विचारले, "ते कोणते दुष्कर्म?" पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, "अल्लाहचा भागीदार मानणे, जादू करणे, विनाकारण हत्या करणे, व्याज आकारणे/ स्वीकारणे, अनाथांचा माल हडप करणे, जिहादच्या वेळी मैदानावरून पळ काढणे व पवित्र, श्रध्दाळू, साध्याभोळ्या महिलांवर व्यभिचाराचे दोषारोपण करणे."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

लाज (लज्जा बाळगणे) हिजरी :

१. माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे की अल्लाह म्हणतो,

''विषयासक्त नजर ही सैतानाच्या विषारी बाणांपैकी एक बाण असून ज्याने तिचा माझ्या भयाने त्याग केला (अर्थात परस्त्रीवर वाईट दृष्टी टाकण्याचे टाळले) तर मी त्याच्या श्रध्देत रुचि व गोडवा त्याच्या मनात निर्माण करीन.''

(तबरानी)

२. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात,

''लज्जा परिपूर्ण पुण्य आहे.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

मद्य व जुगाराचा निषेध :

कुरआनात म्हटले आहे,

''हे श्रद्धावंतांनो, ही दारू आणि जुगार व वेदी आणि शकून ही सर्व अमंगल सैतानी कामे होत, यांच्यापासून दूर राहा, आशा आहे की तुम्हाला यश मिळेल.''

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांची शिकवण इतकी प्रभावकारी होती की, अरब लोक जे मद्य व जुगारामध्ये रात्रंदिवस मग्न राहायचे ते त्या शापित सवयीपासून पूर्णतः मुक्त झाले. नशाबंदीचा आदेश मिळताच मद्याची मडकी फोडून टाकण्यात आली. मदीनेच्या गल्लीबोळांत मद्याचे पाट वाहू लागले. एका ठिकाणी मद्यपी लोकांची महफिल रंगली होती. दहा-बारा जण नशेत धुंद झाले होते. इतक्यात पैगंबरांची घोषणा ऐकू आली की, दारू निषिध्द करण्यात आली आहे. नशेत असूनही अल्लाहच्या आदेशाचे तुरंत पालन करण्यात आले. मद्यप्राशन थांबविण्यात आले व मद्याची मडकी फोडण्यात आली.

वर्तमानकाळात जुगार व मद्याचे आकर्षण वाढल्यामुळे अनेक समस्या निर्माण झाल्या आहेत. त्यांना संपुष्टात आणण्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीचा अवलंब करायला हवा. त्यांनी ज्या वस्तूंच्या सेवनाने बुद्धी मंद पडते (अर्थात मनुष्य नशेत धुंद होतो) त्या सर्व निषिध्द केल्या आहेत.

निंदानालस्ती करू नये :

कुरआनात म्हटलंय,

''तुमच्यापैकी कुणीही कुणाची चहाडी करू नये. काय तुमच्यापैकी

एखादा असा आहे की जो आपल्या मृत भावाचे मांस खाणे पसंत करील? पाहा, तुम्हा स्वत:ला याची घृणा वाटेल अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा, अल्लाह मोठा पश्चात्ताप स्वीकारणारा आणि परम कृपाळू आहे.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटलंय,

''निंदानालस्ती करणाऱ्यास स्वर्गातमध्ये प्रवेश मिळणार नाही.''

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

अत्याचार व स्वार्थाचा त्याग :

''अत्याचारापासून अलिप्त राहा, कारण अत्याचार जगाच्या अंतिम दिवशी अंधाराचे रूप धारण करील. स्वार्थाचा त्याग करा, कारण तुमच्या पूर्वजांचा स्वार्थामुळेच सर्वनाश झाला होता. लालसेपोटी त्यांनी लोकांचे रक्त सांडले व त्यांनी अल्लाहने निषिध्द केलेल्या वस्तूंना वैध केले होते.'' (हदीस : मुस्लिम)

रागावर काबू ठेवावा :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हटले आहे,

''दुसऱ्यांना आपटणारा शक्तिमान नसतो. शक्तिमान तर तो मानला जाईल जो रागावर काबू करू शकतो.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

जिभेवर व गुप्तांगावर नियंत्रण :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणालेत,

''जी व्यक्ती आपल्या दोन जबड्यांच्या व दोन पायांच्या मध्यभागी असलेल्या (जीभ व गुप्तांग) या दोन अवयवांवर नियंत्रण ठेवू शकते त्या व्यक्तीला मी स्वर्गप्राप्तीची खात्री देतो.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

ईर्षा बाळगू नये :

''माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले होते की, हेवादावा बाळगू नका, कारण ईर्षेमुळे मनुष्यातले सर्व सद्‌गुण संपुष्टात येतात, जसे आग लाकडाला जाळून खाक करते तसेच ईर्षा सद्‌गुणांना

संपुष्टात आणते.''  (हदीस : अबू दाऊद)

**सुस्वभावी व्हावे :**

१. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

''ज्याच्या स्वभावात मृदुता नाही त्याला चांगुलपणा प्राप्त होऊ शकत नाही.''  (हदीस : बुखारी)

२. माननीय जाबिर (रजि.) यांचे निवेदन आहे की, अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

''अल्लाह त्या व्यक्तीवर दया करो जी क्रयविक्रय करताना व परतफेडीची मागणी करताना मृदु भाषेचा वापर करते.''  (हदीस : बुखारी)

भाग २

# पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी मुस्लिमेतर मान्यवरांचे विचार

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन व शिकवणीने संपूर्ण जगात कल्याणकारी क्रांती निर्माण केली. ज्या विद्वान मान्यवरांनी निष्पक्षपणे त्यांच्या जीवन व शिकवणीचे अध्ययन केले आहे, ते त्यांची महानता स्वीकारल्याशिवाय राहत नाहीत.

पैगंबर मुहम्मद (स.) व इस्लाम धर्माबाबतचे काही विद्वानांचे विचार पुढे दिले आहेत.

## स्नेह व सहिष्णुतेचे प्रचारक

स्वामी विवेकानंद म्हणतात,

''पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जगास समानतेचा संदेश दिला आहे. त्यांनी मानवजातीमध्ये स्नेह व सहिष्णुतेचा प्रचार केला आहे. धर्मात जात, जमात, वंश व गटबाजीला स्थान नसावे असा त्यांचा संदेश आहे.''

स्वामी विवेकानंद इस्लाम धर्माचे मोठे प्रशंसक होते व इस्लामच्या बंधुभावाच्या तत्त्वाने ते अतिशय प्रभावित झाले होते. 'वेदान्ती मस्तिष्क व इस्लामी शरीर' हाच भारतीय समाजाच्या मुक्तीचा मार्ग आहे असे ते मानत असत. दिनांक १० जून १८९८ रोजी त्यांनी त्यांचे नैनीतालनिवासी मित्र मुहम्मद सरफराज हुसैन यांना पत्रात लिहिले होते, ''हे अनुभवाने सिध्द झाले आहे की, व्यावहारिक जीवनाच्या स्तरावर जर कोणत्या धर्माने समानतेचे तत्त्व कौतुकास्पदरीत्या अमलात आणले असेल तर ते केवळ इस्लामनेच. इस्लाम समस्त मानवजातीला समानतेने पाहतो व समानतेने वागवितो. यालाच अद्वैत (एकत्व) म्हणतात. म्हणूनच आमचा विश्वास आहे की, व्यावहारिक इस्लामच्या सहायतेविना, अद्वैताचा सिध्दान्त मग तो कितीही उत्तम व चमत्कारपूर्ण असो, विशाल मानवसमाजाकरिता निरूपयोगी ठरेल!''

- विवेकानंद साहित्य, खंड ५, पृ. ४१५

स्वामी विवेकानंद यांनी स्पष्ट शब्दात म्हटले आहे की, ''भारतात इस्लाम

धर्माचा प्रसार तलवार (बल प्रयोग), फसवेगिरी व भौतिक प्रलोभनाद्वारे झालेला नाही.''

- विवेकानंद साहित्य, खंड ८ पृ.३३०

इ. स. १९३७ साली मद्रास (चेन्नई) येथे प्रकाशित झालेले, सी.एस.श्रीनिवास यांच्या 'हिस्ट्री ऑफ इंडिया'मध्ये उल्लेख आहे,

''इस्लामचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जेव्हा एका शासकाचा दर्जा प्राप्त केला तेव्हासुध्दा ते पूर्वीसारखेच साधेपणाने राहत असत. ते सुधारकही होते व विजेतेही. त्यांनी लोकांना चारित्र्यवान बनविले. बदल्याच्या भावनेस अनुचित मानले व विनाकारण होणारे रक्तपात थांबविले. विखुरलेल्या जातीजमातीना एका संघटित समाजाचे स्वरूप दिले व त्यांना अशा नात्यात गोवले जे कौटुंबिक नात्यापेक्षा अधिक स्थायी सिध्द झाले.

त्यांनी पक्षपातग्रस्त, द्वेषयुक्त व पतित अवस्थेत असलेल्या लोकांना सत्याचा संदेश देऊन उच्चावस्था प्राप्त करून दिली. आपापसातल्या कौटुंबिक (जातिवादी) बैमनस्यातून मुक्त करून सहिष्णुता व बंधुभावाच्या नात्याने जोडले. खरोखर, मानवी कल्याणकर्त्याच्या स्वरूपात त्यांचे जगात आगमन झाले होते.''

- भारतीय सभ्यता पर मुस्लिमों के उपकार, पृ.३१

## आदर्श जीवन

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी महात्मा गांधी यांचे विचार,

''मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या चरित्राचे अध्ययन करीत होतो. मी पुस्तकाचा दुसरा भागही समाप्त केल्यानंतर मला सुचेनासे झाले, कारण या महान प्रतिभाशाली जीवनाचे अध्ययन करण्यासाठी माझ्याकडे दुसरे पुस्तक उपलब्ध नव्हते. माझा विश्वास पूर्वीपेक्षाही अधिक दृढ झाला की, इस्लामची विश्वव्याप्ती तलवारीच्या शक्तीने साध्य झालेली नाही. इस्लामच्या विजयाचे कारण होते पैगंबरांचे साधे जीवन, त्यांची नि:स्वार्थ वृत्ती, प्रतिज्ञापालन व निर्भयता, त्यांचे त्यांच्या सहकार्यावरील व अनुयायांवरील प्रेम व अल्लाहवरील दृढ विश्वास. ही तलवारची शक्ती नव्हती, उलट मुहम्मद (स.) यांचे हे सर्व विशेष गुण होते ज्यांनी सर्व अडीअडचणी दूर करून सर्व कठीण परिस्थितींवर विजय प्राप्त केला.

मला कोणीतरी सांगितले की, दक्षिण आफ्रिकेत राहणाऱ्या लोकांना त्या इस्लामच्या प्रचाराने भय वाटत आहे ज्या इस्लामने मोरक्कोला प्रकाशमय केले व जगातील लोकांना भाऊबंधासारखे जगण्याचे सुखद अनुभव दिले आहेत. वास्तविक

पाहता युरोपियन लोक इस्लामला भीत नाहीत. त्यांना भीती वाटते की, जर आफ्रिकेतील रहिवाशांनी इस्लाम स्वीकारला तर ते श्वेत जातीच्या लोकांशी बरोबरीचा अधिकार मागू लागतील. त्यांनी घाबरायलाच हवे. सर्वांत बंधुत्व निर्माण होणे त्यांना पाप वाटत असेल, कारण त्यामुळे त्यांचे वांशिक वर्चस्व कायम राहू शकणार नाही. त्यांनी अवश्य भयभीत व्हायला हवे, कारण मी पाहिले आहे की, निग्रो ख्रिस्ती झाला तरी तो गोऱ्या कातडीच्या ख्रिस्तीसमान होत नाही. मात्र तो इस्लामचा स्वीकार करताच त्याच पेल्यात पिऊ लागतो, त्याच ताटात जेऊ लागतो ज्यात इतर मुस्लिम पाणी पितात व भोजन करतात. हेच वास्तविक सत्य आहे, ज्यामुळे युरोपियन भयभीत होत आहेत.''

- जगतमहर्षि, पृ.२

## मानवता पुन्हा जीवित झाली

स्वामी लक्ष्मणप्रसाद लिहितात,

''आस्था, विश्वास, पूजा-अर्चना, नैतिकता, सामाजिकता या सर्वांचे आवाहक पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनापूर्वी जगाला आशेची किरणे दिसत नव्हती. विश्वव्यापी अंधकार व दिशाहीन परिस्थितीत संस्कृती व सभ्यतेच्या प्रकाशाचे दर्शन होत नव्हते. सौजन्य नष्टप्राय झाले होते. निसर्गाचे वास्तविक सौंदर्य व आध्यात्मिकतेचा आनंद नास्तिकतेच्या अंधकारात लुप्त झाला होता. मानवाला अल्लाहच्या अस्तित्वाचा विसर पडला होता आणि मूर्तिपूजा व इतर दुष्कर्माच्या शृंखलेत तो जखडला गेला होता. अशा परिस्थितीत मानवता पुन्हा जीवित झाली. आशिया खंडाच्या दक्षिण पश्चिमेस खाडीचा प्रदेश आहे जो अरबस्थानाच्या नावाने ओळखला जातो. याच अज्ञान व दुष्कर्माच्या केंद्रातील फारान पर्वताच्या शिखरातून तेजस्वी किरणांनी जागतिक परिस्थितीत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणले. कानाकोपरा ज्ञानाच्या झोतात प्रकाशमान झाला.

तेराशे वर्षांपूर्वी अज्ञानग्रस्त मक्का क्षेत्राच्या एका कोपऱ्यातून क्रांतिकारी आवाज ऐकू आला ज्याने अत्याचार पूर्ण वातावरणात चलबिचल निर्माण केली. त्याच ठिकाणाहून मार्गदर्शनाचा झरा वाहू लागला व मनरूपी मृतप्राय झालेल्या शेतांनी हिरवळीचे रूप धारण केले. याच वाळवंटी बगिचात आध्यात्मिकतेचे एक पुष्प पल्लवीत झाले ज्याच्या सुगंधाने मानवी मन व बुध्दीवर लिप्त असलेला नास्तिकतेचा गंध नष्ट झाला.'' -'अरब का चाँद' या पुस्तकातून

# एकेश्वरत्वाचा सदुपयोग

हिंदीचे ज्येष्ठ साहित्यकार भारतेन्दु हरिश्चंद्र लिहितात,

''ज्या काळात अरबस्थानातील लोक बहुदेवोपासने (अनेकेश्वरत्वा) च्या दाट अंधकारात चाचपडत होते, त्याच काळात महात्मा मुहम्मदांचा जन्म झाला व त्यांनी त्यांना एकेश्वरवादाचा सदुपदेश दिला. अरबस्थानाच्या पश्चिमेस येशु ख्रिस्ताचा भक्तिमार्ग प्रशस्त झाला होता. अरब व इराण इत्यादी देशावर त्याचा विशेष परिणाम झाला नव्हता. अरबासारख्या कट्टर समाजापुढे नवीन धर्माचा प्रचार करणे महात्मा मुहम्मदव्यतिरिक्त इतर कोणास शक्य झाले नसते. तत्कालीन अरब मूर्ख, स्वार्थी, निर्दयी व कट्टर पाशवीवृत्तीचे होते. मात्र काही लोक स्वतःला इब्राहीमच्या वंशातले मानत असत व मूर्तिपूजेस वर्ज्य मानत असत, पण सामाजिक दडपणामुळे सर्वच अरब बहुदेव उपासक झाले होते. अशा भयंकर परिस्थितीत मक्केत मुहम्मद या चंद्राचा उदय झाला व एकेश्वरवादाचा मार्ग दृष्टिगोचर झाला.''

- भारतेंदु हरिश्चंद्र समग्र

## संपूर्ण मानवजातीचे मार्गदर्शक :

लाला काशीराम चावला 'ऐ मुस्लिम भाई' या पुस्तकात लिहितात,

''सर्व धर्मांचे संस्थापक, मोठमोठ्या घराण्यांत जन्माला आले. त्यांच्या जन्माच्या वेळी आनंदोत्सव साजरा करण्यात आला, वाद्ये वाजविली गेली. उदाहरणार्थ, येशू ख्रिस्त, भगवान बुध्द, पैगंबर मूसा (अ.) भगवान कृष्ण, भगवान महावीर, गुरू नानक या सर्वांचे बालपण अत्यंत सुखात व वैभवात पार पडले. मात्र पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या दुःखाचा आरंभ त्यांच्या जन्माअगोदरच सुरू झाला होता.''

आदरणीय मुहम्मद (स.) यांची आई गर्भवती असतानाच अर्थात त्यांच्या जन्मापूर्वी त्यांच्या वडिलांचा मृत्यू झाला. सहा वर्षाच्या वयातच ते आईच्या प्रेमाला मुकले. दोन वर्षे आजोबांनी पालनपोषण केले. मुहम्मद (स.) यांच्या वयाच्या आठव्या वर्षी आजोबांचा स्वर्गवास झाला. नंतर त्यांचे पालनपोषण व संरक्षण काकांनी केले. अशा प्रकारे बालपण शिक्षण व सुखशांतिशिवाय घालवावे लागले. हा एक अल्लाह चमत्कार नाही का? ज्याचे बालपण इतक्या कठीण अवस्थेत गेले होते, तोच आज मानवजातीच्या विशाल जनसमूहाचा मार्गदर्शक नेता मानला जात आहे. त्यानेच

अरबसारख्या मागासलेल्या देशात निराश्रित अवस्थेत राहून साऱ्या जगाच्या लोकांना मानवतेचा संदेश दिला आहे.

कोणालाही कल्पना नव्हती की, हा एका अनोळखी कुटुंबात जन्माला आलेला निरक्षर अनाथ बालक अरबस्थानातून अज्ञानाचे साम्राज्य नष्ट करील. संपूर्ण जगात इस्लामचा संदेश पोहचविणारा 'रसूल' होईल व कुरआनचा प्रचार करणारा ''नबी'' होईल. मूर्ख लोकांमध्ये क्रांती निर्माण करणारा सुधारक होईल व एका नव्या अत्यंत वेगळ्या धर्माचा सर्वत्र प्रसार करील. स्वतः निरक्षर असूनही अत्यंत अल्पशा काळात जगाच्या फार मोठ्या जनसमूहाला शिक्षण आणि ज्ञानाने परिपूर्ण करील. त्यांनी दिलेले ज्ञान संपूर्ण मानवजातीसाठी निर्विवाद आदर्श सिध्द झाले आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उदारता व समता, सत्य व न्याय तसेच शेजाऱ्यांबाबत जे आदर्श लोकांपुढे मांडले ते निश्चितच आश्चर्यचकित करणारे आहेत. त्यांच्या सुव्यवहाराने तसेच समतेच्या भावनेने कोणीही प्रभावित झाल्याशिवाय राहिला नाही. त्यांनी संपूर्ण जीवनात कोणत्याही गुलामाला, बालकाला व जनावराला मारले नाही. एवढेच नव्हे तर त्यांनी कोणाला शिवीही दिली नाही. एकदा एका मांजरीला, तिला तहान लागली म्हणून प्रक्षालण (वुज़ू) च्या भांड्यातले पाणी पाजले होते. एकदा एक मांजर त्यांच्या बिछान्यात झोपल्याचे पाहून तिला न हकलता वेगळ्या ठिकाणी झोपले. त्यांनी चिमण्यांना व मुंग्याना मारू नये असा आदेश दिला. कुत्र्यांना पाणी पाजणाऱ्या अपराध्यांना क्षमादान दिले. युध्दबंदींना सन्मानजनक वागणूक दिली. अत्यंत महत्त्वपूर्ण युध्दनियम निश्चित केले. त्यानुसार स्त्रिया, बालक, वृध्द, निद्रिस्त व निःशस्त्र लोकांवर शस्त्र उगारण्याची मनाई केली. शेतातील पिकांचे व राहत्या घरांचे नुकसान करू नये अशी कायदेशीर तरतूद केली.

ते अन्य जातीच्या सरदारांचा आदरसत्कार करीत असत. अन्य धर्माच्या प्रतिष्ठित व विद्वान लोकांशी सन्मानपूर्वक भेटत. ते मित्र व शत्रू दोघांकरिता अल्लाहकडे प्रार्थना करीत. उहुदच्या युध्दात त्यांच्या चेहऱ्यावर दगड लागला व त्यांचे दात तुटून पडले तेव्हा ते उद्‌गारले, ''हे अल्लाह, तू माझ्या समाजाच्या लोकांना क्षमा कर, कारण त्यांना माहीत नाही (की ते काय करीत आहेत).''

ते अत्यंत दानशील व उदार मनाचे होते. याचक कोणत्याही धर्माचा व जातीचा असो, त्यांच्या दारावरून रिक्तहस्त जात नसे. त्यांचा उपदेश होता, सृष्टीच्या प्राण्यांवर दया करा व अल्लाहचे भय बाळगा. ते उधार घेऊन लोकांच्या गरजा पूर्ण करीत असत. त्यांचा आदेश होता की, युध्दात मारले गेलेल्या शत्रूंचे मृतदेह नष्ट करण्यात येऊ नयेत. स्त्रिया व बालकांची हत्या करण्यात येऊ नये. शरीराचे एक एक अवयव कापून वध करण्यात येऊ नये. शरीराचा कोणताच भाग जाळू नये.

त्यांची सत्यप्रवृत्ती, शुध्द अंत:करण प्रामाणिकता व न्यायनिष्ठेची केवळ मुस्लिमच नव्हे तर अबू जहल व अबू सुफियानसारखे कट्टर शत्रूही प्रशंसा करीत असत. माणसाचे इतरांनी केलेले गुणगानच त्यांचे खरे कौतुक असते व त्यांचे खरे दुर्गुणही तेच असतात ज्यांचा उल्लेख त्याचे मित्र नि:संकोचपणे करतात.

तत्कालीन अरब अशिक्षित, अडाणी, भांडखोर, अंधविश्वासू, जुगारी, दरोडेखोर, व्यभिचारी व वचन भंग करणारे, मुलींना जिवंत गाडून टाकणारे व आपल्या सावत्र आईशी लैंगिक संबंध ठेवणारे लोक होते. आश्चर्याची बाब म्हणजे, तेच लोक आज साध्या सरळ यात्रेकरूंचा तसेच अतिथींचा आदरसत्कार करतात, ते मेहनती, प्रामाणिक, सहकार्य करणारे, आज्ञाधारी, समतावादी व एकेश्वरवादी आहेत. अत्यंत अल्प काळात लोकांच्या आचारविचारात, स्वभावात व वागणुकीत असाधारण क्रांती घडवून आणणे; पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अलौकिक शिकवणीचा हा चमत्कारच मानायला हवा.

त्यांना इतके अधिकार प्राप्त असताना व ते स्वत: इतके प्रभावशाली असूनही त्यांच्या स्वभावात कोणताच अहंभाव निर्माण झाला नाही. एकदा प्रवासात असताना भोजन तयार करावयाचे होते. सर्व सहकाऱ्यांनी काम वाटून घेतले. सहकाऱ्यांनी मुहम्मद (स.) यांना काम करण्यापासून रोखण्याचा प्रयत्न केला तरीही त्यांनी जंगलातून लाकडे उचलून आणली व म्हटले, ''मी स्वत:ला श्रेष्ठ का मानावे?''

बदरच्या युध्दाला जाताना स्वारीसाठी पुरेशी जनावरे नव्हती. लोक आळीपाळीने स्वारी करीत. त्याचप्रमाणे मुहम्मद (स.) देखील कधी उंटाच्या पाठीवर तर कधी पायी चालत होते.

यांचा साधेपणा कमालीचा होता. हे तर अगोदरच सांगण्यात आले आहे की, ते स्वत: घरकाम करीत असत. कपड्यांना ठिगळ लावणे, फाटलेली पादत्राणे दुरुस्त करणे, केरकचरा साफ करणे, जनावरांचे दूध काढणे, बाजारातून खाद्य पदार्थ आणणे, इत्यादी सर्व कामे ते नियमितपणाने करीत असत. बडेजावपणा व अवडंबराची त्यांना आवड नव्हती. जाडेभरडे कपडे परिधान करीत. नटणेसजणे त्यांना मुळीच आवडत नसे. एकदा ते आपल्या सुकन्या फातिमा (रजि.) यांच्या घराकडे गेले. तिच्या घराच्या प्रवेशद्वारावर सुंदर पडदे लावल्याचे दिसताच ते तिथूनच परत फिरले. त्यांना कारण विचारले असता ते म्हणाले, ''ज्या घरातील लोक घराच्या सजावटीत रमत असतील तेथे मला जावेसे वाटत नाही.''

ते असे का करत होते? याचे कारण असे की, त्यांना अल्लाहचे आदेश प्राप्त झाले होते की, अल्लाहप्रेमाच्या तुलनेत ऐहिक प्रेम तुच्छ आहे.

कुरआनात म्हटले आहे,

''हे अल्लाहवर विश्वास करणाऱ्यानो! तुमच्या संपत्ती व संततीच्या कारणामुळे अल्लाहच्या उपासनेकडे तुम्ही दुर्लक्ष करू नका. जो असे काही करेल त्याला नुकसान सहन करावे लागेल.''

ते संपूर्ण रात्र अल्लाहच्या उपासनेत लीन राहत. जेव्हा घरातले लोक झोपी जात तेव्हा ते बिछान्यावरून गुपचूप उठून ईशस्मरणात लीन होत. त्यांची सुपत्नी माननीय आएशा सिद्दिका (रजि.) म्हणतात, ''एका रात्री मला जाग आली तेव्हा ते बिछान्यात नव्हते. मला वाटले की, ते हरमच्या दुसऱ्या खोलीत (इतर पत्नीकडे) गेले असतील, पण नंतर अंधारात चाचपडल्यानंतर माझ्या लक्षात आले की त्यांचे पवित्र मस्तक धरतीवर टेकले होते व ते प्रार्थनेत लीन होते. मला माझ्या विचारांचा पश्चात्ताप झाला व मी खजील झाले.'' हाच आहे इस्लाम! इस्लामचा अर्थ आहे अल्लाहसमोर नतमस्तक होणे. ते जणू काही सतत अल्लाहसमक्ष उपस्थित राहत. युध्दक्षेत्रावरही ते नमाज सोडत नसत.

अल्लाहवर त्यांची दृढ श्रध्दा होती. त्यांचे म्हणणे होते की, पादत्राणाचा दोराही तुटल्यास ते अल्लाहकडे मागा. एकदा त्यांची सुकन्या माननीय फातिमा (रजि.) घरगुती कामाच्या ओझ्याने कंटाळून त्यांच्याकडे आली व दबकत दबकत

एक घरकाम करणाऱ्या सेविकेची मागणी केली.

तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''प्रिय कन्ये, तू अल्लाहवर श्रध्दा ठेव. त्याच्या आदेशांचे पालन कर. आपल्या घरवाल्यांची स्वत:च सेवा कर. जर तुला थकवा वाटत असेल तर ''सुब्हानल्लाह (अल्लाह पवित्र आहे) ३३ वेळा, ''अल् हम्दुलिल्लाह'' (सर्व प्रशंसा अल्लाहकरिता आहे) ३३ वेळा व ''अल्लाहु अकबर'' (अल्लाहच महानतम आहे) ३४ वेळा असा जप करीत जा. तुझा थकवा नाहीसा होईल.''

याला म्हणतात खरी भक्ती! याला म्हणतात खरी अल्लाहची उपासना! याचे नाव आहे अल्लाहप्रेम!

ते म्हणत असत, ''मुस्लिमाची सर्वप्रथम ओळख आहे की, तो अल्लाह व न्यायानिवाड्याच्या दिवसाचे भय बाळगतो.''

''ऐ मुस्लिम भाई,'' पृ.२५२ ते २५८

## संपूर्ण जगासाठी दयावंत

महात्मा गांधी यांचे पुत्र देवदास गांधी यांच्या निबंधातील एक अंश:

''एका शक्तिशाली सूर्यासमान पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अरबच्या वाळवंटी प्रदेशाला प्रकाशमान केले, ज्या काळी संपूर्ण जग. अंधकाराने आच्छादित होते व जेव्हा ते काळाच्या पडद्याआड गेले तेव्हा त्यांना सोपविलेली कामगिरी पूर्ण झाली होती. त्यांनी केलेल्या पवित्र कामाचा लाभ संपूर्ण जगाला त्याच्या अंतापर्यंत मिळणार आहे. जगात खरे मार्गदर्शक फार थोडे झाले आहेत व त्यांच्या कार्यकाळात बरेच मोठे अंतर होते. ज्या लोकांनी मुहम्मद (स.) यांच्या जीवनचरित्राचे शुध्द मनाने व पूर्ण श्रध्देने अध्ययन केले आहे, त्यांनी निश्चितपणे मान्य केले आहे की, ते महान धर्म उपदेशक होते. त्यांनी ज्या काळात धर्मोपदेशाचे कार्य केले, त्या काळात अरबभूमी आध्यात्मिक व नैतिकदृष्ट्या अत्यंत निम्नस्तरावर होती. त्या पृष्ठभूमीचा विचार केल्यास त्यांची प्रतिमा अधिक उजळ असल्याचे जाणवते.

मुहम्मद (स.) यांचा सभ्य व उन्नत वातावरणात जन्म झाला नव्हता.

त्यांच्या काळात एकही असा माणूस नव्हता की ज्याच्याकडून ते आध्यात्मिक शिक्षण प्राप्त करू शकले असते. त्या काळात अरबस्थानात अल्लाही धर्माचा लवलेशही नव्हता. संपूर्ण अरबस्थान अंधकारात बुडालेला होता. दुष्ट वातावरण व मानवी अध:पतन चरमसीमेला पोहचले होते. त्या काळात अल्लाही अनुकंपेच्या स्वरूपात मुहम्मद (स.) यांचा उदय झाला. अशा परिस्थितीत त्यांना जर 'रहमतुल्लिल आलमीन' (जगासाठी दयावंत) अशी पदवी दिली गेली तर यात आश्चर्य वाटण्याचे काही कारण नाही.

त्यांचे पवित्र जीवन कथनी व करनीचा मिलाफ होते. त्यांचा जीवननियम होता की "आधी केले मग सांगितले." त्यांनी कधीही अशा कार्याची शिकवण लोकांना दिली नाही ज्याचे उदाहरण त्यांनी स्वत: घालून दिले नसावे.

त्यांच्या पवित्र जीवनात पैगंबरत्वप्राप्तीनंतरही विशेष अंतर निर्माण झाले नाही. त्यांनी संपूर्ण जीवन सरळ व साध्या पध्दतीने व्यतीत केले. अनेक साम्राज्यांची संपत्ती उपलब्ध असतानाही त्यांना ऐहिक सुख व भोगविलासने कधीच आकर्षित केले नाही. त्यांचे भोजन अत्यंत अल्प व फारच साधे होते, कारण जेवण जीवनाकरिता आवश्यक आहे. ते चटाईवर व बारदानावर झोपत असत. त्यांचे वस्त्रही साधेसुधे असे. त्यांनी कधीही कोणाकरिता अपशब्दांचा वापर केला नाही. युध्दाच्या मैदानावरसुध्दा ते शत्रूशी अत्यंत सौम्य भाषेत बोलत असत. खरे सांगायचे म्हणजे त्यांना आपल्या इच्छा व मनोकामनांवर पूर्ण संयम प्राप्त होता. गीतेमध्ये कर्मयोगीच्या ज्या गुणांचा उल्लेख आहे त्या सर्वांचा त्यांच्या चारित्र्यात पुरेपूर समावेश होता. ते त्यांच्या नावडत्या कर्तव्यांचेसुध्दा अत्यंत निष्ठा व दृढतेने पालन करीत असत. स्वार्थ व घमेंड त्यांच्या मनास कधीच अस्थिर करू शकली नाही. कर्मयोगी त्या व्यक्तीला म्हणतात जी आपल्या उत्तम विचारांना मूर्त स्वरूप देते. मुहम्मद (स.) एक असेच व्यक्ती होते. मनुष्य असूनही त्यांच्यात अलौकिक गुण होते. सुख, दु:ख, हर्ष, क्षोभ इत्यादींच्या प्रभावाखाली साधारण माणसे जीवन व्यतीत करीत असतात व त्या भावनांच्या प्रभावाने त्यांच्या जीवनात परिवर्तन घडून येते. मात्र मुहम्मद (स.) भावनांनी कधीही प्रभावित झाले नाहीत.

जे लोक वर्तमान समाजव्यवस्थेत व जीवनप्रणालीमध्ये परिवर्तन आणू इच्छितात व समाजाचे नवनिर्माण करू पाहत आहेत, त्यांच्यावर मुहम्मद (स.) यांनी मेहनत-मजुरीसंबंधी जे आदर्श घालून दिलेत, त्यांचा विशेष प्रभाव पडेल.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी व्यावहारिक उदाहरणे प्रस्तुत केली. त्यांचा लोकांना विसर पडला आहे. ते स्वतःचे वस्त्र स्वतःच दुरुस्त करीत असत. एवढेच नव्हे तर ते स्वतःच्या बूट-चपला स्वतः दुरुस्त करीत असत. ते घरकामात नोकरचाकरांना मदत करीत असत. मशीदीच्या बांधकामात मजुरांबरोबर काम करीत असत. मजुरांबरोबर काम करताना ते त्यांच्यात इतके मिसळून जात की कोणी त्यांना ओळखू शकत नसत.

त्यांना मुले खूप आवडत असत. त्यांच्याबरोबर तें खूप खूश राहत. ती भाग्यशाली मुले ज्यांना त्यांचा सहवासाचा आनंद मिळाला, त्यांना स्वतःच्या घरातसुद्धा इतका आनंद मिळाला नसेल. बालकांच्या सहवासात राहणे त्यांच्याकरिता काही योगायोग नव्हता. त्यांचा हा नियमित कार्यक्रम होता. ते बालकांना शोधून काढीत व आपले आदर्श विचार त्यांच्या मनावर बिंबविण्याचे प्रयत्न करीत. यापेक्षा शिक्षण व उपदेशाचा अधिक प्रभावी दुसरा कोणता मार्ग असू शकतो?''

मासिक 'पेशवा' दिल्ली, जुलै १९३१

## अनुपम जीवन

हिंदीचे प्रख्यात साहित्यकार सरदार पूर्णसिंह 'अध्यापक', साहित्यिक उपमांचा प्रयोग करून लिहितात,

''बघा 'हिरा' गुफेत एक अनाथ, जगापासून लपून छपून विचित्र निद्रावस्थेत आहे. गल्लीतल्या दगडाकडे जसे कोणी लक्ष देत नाही तसेच सामान्य माणसासारख्या या अनाथालाही कोणी ओळखत नव्हते. एका उदार धनवान महिलेकडे तो नोकरी करत होता. त्याची सामाजिक प्रतिष्ठा केवळ एका गुलामासारखी होती. अचानक काहीतरी अल्लाही चमत्कार घडला ज्यामुळे या अपरिचित व अनोळखी व्यक्तीला दिव्यदर्शन घडले. तो जागा झाला. जगावर असंख्य वजांचा लखलखाट झाला. अरबस्थानात जणू विस्फोट होऊन आगीचे डोंब निर्माण झाले. या महापुरूषाच्या नेत्रातील ज्वालेने इंद्रप्रस्थ ते स्पेनपर्यंतचा भूभाग प्रज्वलित झाला. हिरा गुफेत झोपणाऱ्या अज्ञान इसमाने हाक दिली. संपूर्ण पृथ्वी भयभीत झाली. होय, जेव्हा मुहम्मद (स.) ने ''अल्लाहु अकबर'' (अल्लाह सर्वश्रेष्ठ आहे) ची घोषणा दिली, तेव्हा संपूर्ण जग स्तब्ध झाले. काही काळानंतर निसर्गाने घोषणेचा प्रतिध्वनी चारी दिशांना पसरविला. पक्षी 'अल्लाहु अल्लाहु' गाऊ लागले व मुहम्मद (स.) यांचा संदेश

# पैगंबर मुहम्मद (स.) यांचे पवित्र विवाह

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या संपूर्ण जीवनात एकूण १२ विवाह केले. वयाच्या पंचवीसाव्या वर्षी त्यांनी ४० वर्षीय विधवा खदीजा (रजि.) यांच्याशी पहिला विवाह केला. माननीय खदीजा (रजि.) यांचा पैगंबरत्व प्राप्तीच्या दहाव्या वर्षी मृत्यू झाला. त्या वेळेस पैगंबर मुहम्मद (स.) यांचे वय ५० वर्षे होते. या अवधीत त्यांनी दुसरे विवाह केले नव्हते. माननीय खदीजा (रजि.) यांच्या निधनानंतर त्यांनी माननीय सौदा बिन्ते जमआ (रजि.) या ५० वर्षीय महिलेशी विवाह केला. त्यांची पत्नी माननीय आएशा (रजि.) या सर्वात कमी वयाच्या होत्या. नंतर मुहम्मद (स.) यांनी विविध कारणाने माननीय हफ्सा बिन्ते उमर (रजि.), जैनब बिन्ते खजीमा (रजि.), उम्मे सलमा (रजि.), जैनब बिन्ते जहश (रजि.), जुवेरिया बिन्ते हारिस (रजि.), उम्मे हबीबा (रजि.), सफिया बिन्ते हई (रजि.) व मैमूना बिन्ते हारिस (रजि.) यांच्याशी विवाह केले.

या सर्व महिलांचा अरबस्थानातील प्रतिष्ठित घराण्याशी संबंध होता. त्यांच्याशी विवाह केल्याने इस्लाम धर्माचा प्रचार, प्रसार व उत्कर्ष झाला आणि बलिष्ठ घराण्यांशी घनिष्ट संबंध स्थापित झाले.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ज्या कारणांनी अनेक विवाह केले त्यांच्यापैकी काही कारणे खाली देत आहोत.

अरबस्थानात जातिवादी समाजव्यवस्था अस्तित्वात होती. प्रत्येक व्यक्ती आपल्या जमातीच्या अटीशर्तींनी बांधलेली होती. ती अन्य जातींची पर्वा करीत नसे. शक्तिशाली जमात कमकुवत समाजावर वर्चस्व गाजवीत होती व त्यांना तुच्छ लेखत असे. ज्या व्यक्तीचा कोणत्याच शक्तिशाली जमातीशी संबंध नसे ती कोणतेच समाजकार्य करू शकत नव्हती. कोणतेही व्यापक समाजसुधारणेचे कार्य करण्यासाठी वेगवेगळ्या सशक्त गौरवशाली जमातींचे समर्थन प्राप्त करणे अनिवार्य होते. हेच मुहम्मद (स.) यांच्या अनेक विवाहांचे सामाजिक व राजनैतिक कारण होते. उदाहरणार्थ, माननीय जुवेरिया (रजि.) यांचा संबंध बनू मुस्तलिक घराण्याशी होता. हे अत्यंत कुख्यात मात्र शक्तिशाली घराणे होते. माननीय जुवेरिया (रजि.) यांचे पिताही जबरदस्त दरोडेखोर होते. इस्लामी राज्याशी त्यांचे हाडवैर होते व ते कोणत्याच कायद्यास जुमानत नसत. शेवटी त्यांना लष्करी शक्तीद्वारे आटोक्यात आणले गेले. मात्र माननीय जवेरिया (रजि.) यांच्याशी मुहम्मद (स.) यांचा विवाह

झाल्यानंतर त्यांनी कायद्याचे उल्लंघन करणे पूर्णपणे सोडून दिले व इस्लामी राज्याचे समर्थक झाले.

माननीय मैमूना (रजि.) नज्द येथील रहिवासी होत्या. राजनैतिकदृष्ट्या ते महत्त्वाचे क्षेत्र होते व परराष्ट्राशी व्यापारासाठी त्याच क्षेत्रातून प्रवास करावा लागत. तेथील रहिवासी इस्लामचे कट्टर विरोधी होते. त्यांनी इस्लाम धर्माच्या सत्तर अनुयायींची कत्तल केली होती. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय मैमूनाशी लग्न केल्यानंतर संपूर्ण परिस्थितीत बदल झाला. नज्दच्या सर्व लोकांनी इस्लाम धर्माचा स्वीकार केला.

माननीय उम्मे हबीबा कुरैश जमातीचे सर्वांत मोठे सरदार अबू सुफियान यांची कन्या होती. अबू सुफियान मुहम्मद (स.) व इस्लामचा कट्टर विरोधकच नव्हे, तर शत्रूसमान होता. मात्र त्यांच्या मुलीशी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विवाह केल्यानंतर अबू सुफियानने त्यांच्याशी कधीच युध्द केले नाही.

इस्लाम धर्मात बुरखा पध्दतीचा अवलंब केला जात असल्याने महिलांमध्ये इस्लामचा प्रचार प्रसार करण्यासाठी महिला प्रचारकांची गरज होती. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अनेक विवाहांचे हेही एक महत्त्वाचे कारण होते. त्यांच्याच पत्नींनी इस्लामच्या प्रचारात विशेष भूमिका बजावली. त्यांनी महिलांना इस्लामी शिक्षण दिले. पैगंबर मुहम्मद (स.) काळाच्या पडद्याआड झाल्यानंतर इस्लामी शिकवणीच्या प्रसारकार्यात त्यांनी चांगलाच हातभार लावला. माननीय आएशा (रजि.) यांच्याकडून इस्लाम धर्माची बरीच माहिती प्राप्त झाली. त्यांनी महिलांना इस्लामचे शिक्षण व प्रशिक्षण तर दिलेच, त्याबरोबर त्यांच्या बऱ्याच समस्यांचे समाधान करण्याचे उल्लेखनीय कार्य केले. इस्लाम धर्माच्या प्रसारापूर्वी अरबस्थानातच नव्हे तर इतर भूभागातही बहुपत्नीत्वाची प्रथा प्रचलित होती. आपल्या जमातीची जनसंख्या वाढवून जमातीला शक्तिशाली करण्यासाठी अनेक विवाह करीत असत. इस्लामने बहुविवाह पध्दतीस मान्यता तर दिली, मात्र पत्नींची संख्या चारपर्यंतच मर्यादित केली व अशी अट लादण्यात आली की, प्रत्येक पत्नीस समान हक्क देण्यात यावेत व सर्वांशी न्यायाने वागावे. तो जर सर्वांना समान हक्क देण्यास असमर्थ असेल तर त्याने एकाहून अधिक विवाह करू नये व एका पत्नीबरोबर जीवन व्यतीत करावे.

आजही इस्लाम धर्माची बहुभार्या पध्दत पुरुषांच्या स्वाभाविक गरजा समाधानकारकपणे पूर्ण करीत आहे.

# ताईफचा प्रवास

मक्का येथे इस्लाम धर्माच्या प्रचारप्रसार कार्या अनेक अडचणींना तोंड द्यावे लागत असतानाच पैगंबर मुहम्मद (स.) मक्का शहरापासून ६० मैल अंतरावर असलेल्या ताईफकडे रवाना झाले. पैगंबरत्व मिळाल्याच्या दहाव्या वर्षी शव्वाल महिन्यात माननीय जैद बिन हारिस (रजि.) यांना सोबत घेऊन त्यांनी पायी प्रवास सुरू केला. रस्त्यात भेटणाऱ्या प्रवाशाना ते इस्लामचा संदेश देत. मात्र त्यांपैकी एकानेही त्यांच्या आवाहनास प्रतिसाद दिला नाही.

ताईफचे लोक खुशालीत जीवन जगत होते. मोठमोठे बागबगिचे त्यांच्या मालकीचे होते. त्यामुळे ते अत्यंत गर्विष्ट व अहंकारी झाले होते. ताईफ 'लात' नावाच्या प्रसिध्द मूर्तीचे तीर्थस्थान होते. येथे लोक तीर्थयात्रेसाठी येत असत. श्रीमंत व धनवान लोक उन्हाळ्यात तेथेच जाऊन राहत असत.

पैगंबर मुहम्मद (स.) ताईफ येथे पोहचल्यानंतर सर्वप्रथम सकीफ जमातीच्या तीन सरदारांना भेटले. ते तिन्ही सरदार भाऊ होते. एकाचे नाव होते यालैल, दुसऱ्याचे मसऊद व तिसऱ्याचे हबीब. पैगंबर मुहम्मद (स) यांनी त्यांना इस्लामचा संदेश दिला. त्यांनी त्यांची विनंती फेटाळून लावली. कुरैशप्रमाणेच त्यांनाही इस्लामपासून धोका होण्याची भीती वाटत होती.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ताईफ येथे दहा दिवस मुक्काम केला. तेथील सरदारांशी चर्चा केली. मात्र प्रत्येकाने एकच उत्तर दिले, ''तुम्ही येथून चालते व्हा.''

ताईफच्या सरदारांनी तेथील गुलामांना व गुंड पोरांना पैगंबर मुहम्मद (स.) विरुध्द भडकावून त्यांचा पाठलाग करायला सांगितले. ते लोक पैगंबरांचा पाठलाग करीत, त्यांना शिव्या देत, आरडाओरड करीत. हळूहळू जनसमूह वाढत गेला व रस्त्याच्या दुतर्फा लोकांच्या रांगा दिसू लागल्या. नंतर लोकांनी त्यांना दगडांनी जखमी करण्यास सुरूवात केली. त्यांचे पाय रक्तबंबाळ झाले. त्यांची पादत्राणे रक्ताने माखली गेली. ते घायाळ होऊन जमिनीवर बसले. निर्दयी लोकांनी त्यांना उभे केले व ते चालू लागताच पुन्हा दगडांचा वर्षाव सुरू केला. माननीय जैद बिन हारिस यांनी त्यांचा बचाव करण्याचा प्रयत्न केला. तेही जखमी झाले. त्यांच्या डोक्याला इजा झाली. गुंडांनी त्यांचा दूरवर पाठलाग केला. शेवटी ताईफपासून तीन मैलांच्या अंतरावर उतबा व शैबा बिन रबीआ यांच्या बागेत त्यांनी आश्रय घेतला.

माननीय जैद बिन हारिस यांनी त्यांना कर्नुस्सअलब येथे नेले. तेथे त्यांचे रक्ताने माखलेले पाय धुतले. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी काही वेळ विश्राम केला. जैद बिन हारिस यांनी निवेदन केले की, या लोकांना शाप द्या. मात्र दयाळू पैगंबरांनी शाप देण्यास नकार दिला व म्हटले,

"या लोकांनी सत्याचा स्वीकार केला नसला तरी येणारी पिढी एकेश्वरत्वाचा स्वीकार करील!"

किती उदार व महान होते पैगंबर मुहम्मद (स.)!

नंतर पैगंबर मुहम्मद (स.) नखला येथे पोहचले. अल्लाहने जिब्रिल (अ.) यांच्यासोबत पर्वतांच्या ईशदूतांना (फरिश्त्यांना) पाठविले. ते म्हणाले, "आपण जर अनुमती दिली तर हे पर्वतांचे फरिश्ते दोन पर्वतामध्ये मक्का व ताईफला चिरडून टाकतील." पैगंबरांनी त्यांना तसे काही करू नका म्हणून सांगितले.

ताईफहून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी परत येऊन मक्का येथे पुन्हा इस्लामचे प्रचारकार्य सुरू केले. पैगंबरत्वाचे दहावे वर्ष चालू होते. हजचा मोसम जवळ येत होता. जवळपासच्या व दूरवरच्या लोकांचे आगमन होऊ लागले होते. पैगंबरांनी ही योग्य संधी मानून प्रत्येक गटाकडे जाऊन इस्लामचा संदेश द्यायला सुरूवात केली. काही लोकांनी संदेशाचे स्वागत केले व हजनंतर इस्लाम स्वीकारला.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हजच्या काळात अकबाजवळ मदीना येथील खजरज जमातीच्या लोकांना इस्लामकडे आकर्षित करण्याचे प्रयत्न केले होते. मदीना शहरात खजरज व औस ह्या दोन जमाती राहत होत्या. तेथे बरेच यहुदी (ज्यू) लोकही राहत होते. ते आपल्या सभांमध्ये नेहमी भविष्यवाणी करीत की, जगात अंतिम पैगंबरांचे आगमन होणार आहे. ते म्हणत की, जे त्यांचा साथ देतील ते सफल होतील. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी औस व खजरजवाल्यासमोर इस्लामच्या शिकवणीचे वर्णन केले, कुरआनातील काही श्लोकांचे पठण केले तेव्हा ते अत्यंत प्रभावित झाले. त्यांना विश्वास वाटू लागला की, हे तेच अंतिम पैगंबर आहेत ज्यांचा ज्यू विद्वान उल्लेख करीत असत. त्यांच्यापैकी सहाजणांनी इस्लाम धर्मात प्रवेश केला.

ते सहा लोक मदीना येथे जाऊन इस्लामचा प्रचार करू लागले. त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याबद्दलही लोकांना माहिती दिली. लोकांना इस्लामकडे

आमंत्रित केले. अशा तऱ्हेने इस्लाम व पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याबाबत मदीना शहरातील प्रत्येक घरात चर्चा होऊ लागली.

दुसऱ्या वर्षी हजच्या काळात मदीना येथील बाराजण पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या भेटीस आले. त्यांनी इस्लामकरिता सर्वस्व समर्पण करण्याचे आश्वासन दिले. त्यांनी विनंती केली की, इस्लामचे शिक्षण देण्यासाठी कोणाला तरी त्यांच्यासोबत पाठविण्यात यावे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय मुसअब बिन उमैर यांना मदीना येथे जाण्याचे आदेश दिले.

माननीय मुसअब बिन उमैर (रजि.) मदीना येथील प्रत्येक घरात जाऊन इस्लामचा संदेश देत व कुरआनचे पठण करीत. हळूहळू लोक इस्लामचा स्वीकार करू लागले. शेवटी जमातीचा सरदार सअद इब्ने मुआज यानेही इस्लामचा स्वीकार केला. सरदार मुस्लिम झाल्यानंतर संपूर्ण जमातीने सत्यधर्म इस्लामचा स्वीकार केला व ते सर्व मुस्लिम झाले.

त्याच्या पुढील वर्षी हजप्रसंगी मदीना शहराच्या ७२ लोकांनी गुपचुप इस्लाम स्वीकारला व अकबा येथे प्रतिज्ञा घेतली की, कोणतीही परिस्थिती निर्माण होवो ते सर्व पैगंबर मुहम्मद (स.) यांना सहकार्य करतील. त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) समक्ष निम्न गोष्टीची प्रतिज्ञा केली.

१) एक अल्लाहव्यतिरिक्त ते कोणाचीच उपासना करणार नाहीत.

२) चोरी करणार नाहीत.

३) व्यभिचार (लैंगिक दुष्कृत्य) करणार नाहीत.

४) आपल्या संततीचा संहार करणार नाहीत.

५) कोणावरही दोषारोपण करणार नाहीत व कोणाही व्यक्तीबद्दल वाईट बोलणार नाहीत.

६) अल्लाहचे पैगंबर ज्या चांगल्या गोष्टी सांगतील त्यांचा विरोध करणार नाहींत.

अशा प्रकारे मदीना येथे इस्लामचा वेगाने प्रसार होऊ लागला व मुस्लिमांची संख्या वाढत गेली.

# हिजरत (स्थलांतर)

इस्लामच्या प्रचारप्रसाराबाबत कुरैश जमातीच्या लोकांना माहिती मिळत होती. जेव्हा त्यांना माहीत झाले की, पैगंबर मुहम्मद (स.) यांचे मदीना येथे अनेक लोक सहाय्यक व समर्थक झाले आहेत, तेव्हा ते बेचैन झाले, कारण मदीना येथील लोकांवर त्यांचे कोणतेच वर्चस्व नव्हते. त्यांनी सर्व राग मक्का येथील मुस्लिमांवर काढायचे ठरविले व त्यांना अधिकाधिक त्रास देऊ लागले.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मुस्लिमांना मदीना येथे स्थलांतर करण्याचे आदेश दिले व मदीना येथे बंधुत्वाचे मित्रत्वाचे संबंध स्थापित करण्याचा सल्ला दिला. त्यांनी सांगितले,

"अल्लाहने तुमच्या सहायतेसाठी काही बांधवाना प्रेरित केले आहे व तुमच्याकरिता घरदाराचीसुध्दा व्यवस्था केली आहे. तेथे तुम्ही शांतपणे जीवन व्यतीत करू शकाल."

पैगंबर मुहम्मद (स) यांचे आदेश मिळताच मुस्लिमांनी छोट्याछोट्या गटांत स्थलांतर सुरू केले. विरोधकांनी अनेक अडचणी निर्माण केल्या, मात्र मुस्लिम स्थलांतर करीत राहिले. अकबाच्या प्रतिज्ञेनंतर केवळ दोन महिने व काही दिवसांत पैगंबर मुहम्मद (स.) माननीय अबू बकर (रजि.), माननीय अली (रजि.) यांच्याव्यतिरिक्त एकही मुस्लिम स्वच्छेने मक्का येथे स्थायिक राहिला नाही. काही मुस्लिमांना विरोधकांनी बळजबरी रोखून ठेवले होते. माननीय अबू बकर (रजि.) व माननीय अली (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदेशानुसार मक्का येथेच थांबले होते. मुहम्मद (स.) सुध्दा स्थलांतराच्या तयारीत होते, मात्र त्यांना अल्लाह आदेशाची प्रतीक्षा होती. माननीय अबू बकर (रजि.) यांनी दोन उंटांची व्यवस्था करून ठेवली होती.

पैगंबर मुहम्मद (स.) यांना स्थलांतराबाबत अल्लाह आदेश प्राप्त होताच ते मदीनेस जाण्यास तयार झाले. या वार्तेने विरोधकांमध्ये गोंधळ निर्माण झाला. त्यांना इस्लामच्या प्रसाराने भय वाटू लागले. सर्व कुरैश सरदार 'दारून्नदवा' या पब्लिक हॉलमध्ये एकत्र जमले व इस्लामच्या उच्चाटणाबाबत विचार करू लागले. पैगंबर मुहम्मद

(स.) यांच्याविरुध्द कोणती कारवाई केली जावी याबाबत सल्लामसलत होऊ लागली. त्यांच्या चर्चेत भीती व नैराश्याचे वातावरण निर्माण झाल्याचे दिसून येत होते. अचानक अबू जहल याने उभे राहून सांगितले, ''अद्याप कोणालाही सूचला नाही असा एक मार्ग आहे.'' लोकांनी उत्सुकतेने विचारले, ''तो कोणता?''

तो म्हणाला, ''प्रत्येक जमातीतून (घराण्यातून) एक एक शूर पहिलवान निवडण्यात यावा. त्यांनी हातात तलवार घेऊन अचानक एकाच वेळी मुहम्मद (स.) यांच्यावर हल्ला करावा व त्यांना ठार करावे! अशा प्रकारे त्यांना ठार केल्याने कोणा एका जमातीवर आरोप न येता तो सर्व जमातीत विभागला जाईल व बनू हाशिम घराण्याचे लोक सर्व जमातीशी टक्कर घेऊ शकणार नाहीत. विवश होऊन ते 'खूनबहा' (रक्तपाताचा मोबदला) म्हणजे शंभर उंट घेण्यास राजी होतील.

ही सूचना सर्वांना आवडली. सर्व आनंदित झाले. या योजनेस मूर्त स्वरूप देण्यासाठी अंधारमय रात्रही येऊन ठेपली. मारेकरी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या घराच्या दाराजवळ जाऊन बसले. ते पैगंबर मुहम्मद (स.) यांना निद्रित अवस्थेत ठार करण्याच्या तयारीत होते. त्याकरिता ते मध्यरात्री हल्ला करणार होते. पण हे सत्य आहे की, ज्याला अल्लाह तारी त्याला कोण मारी. पैगंबर मुहम्मद (स.) अल्लाहचे प्रिय पैगंबर होते. अल्लाहने त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था केली.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय अली (रजि.) यांना सांगितले,

''तुम्ही माझ्या बिछान्यावर झोपा व अंगावर माझी चादर पांघरूण घ्या. तुम्हाला हे लोक इजा पोहचवू शकणार नाहीत.'' ते पुढे म्हणाले, ''मी आज मदीनेकडे रवाना होईन. माझ्याकडे बऱ्याच लोकांच्या चीजवस्तू (अमानती) पडून आहेत. त्या सर्व संबंधित लोकांना सकाळी परत करा.''

रात्र गडद होताच मुहम्मद (स.) गुपचुप घराबाहेर पडले. मारेकऱ्यांना चाहूलही लागली नाही. ते माननीय अबू बकर (रजि.) यांच्या घरी पोहचले. दोघांनी खिडकीमार्गे घराबाहेर पडून यमनकडे प्रस्थान केले. मक्का सोडताना त्यांनी आपले मनोदय व्यक्त केले ते म्हणाले, ''अल्लाहशपथ, तू अल्लाहची पुण्य भूमी आहेस. मला येथून जाण्याचा आदेश नसता तर मी कधीच गेलो नसतो!''

पैगंबर मुहम्मद (स.) व अबू बकर (रजि.) थोड्या अंतरावर असलेल्या 'सौर' नावाच्या गुफेजवळ पोहचले. त्या गुफेत ते तीन दिवस लपून राहिले. चौथ्या दिवशी मदीनेकडे रवाना झाले.

कुरैश विफल झाले. त्यांना विचार पडला की, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या बिछान्यावर अली का झोपले आहेत व पैगंबर मुहम्मद (स.) गेलेत तरी कुठे? त्यांनी पुन्हा सभा आयोजित केली. त्यांनी ठरविले की, पैगंबर मुहम्मद (स.) व माननीय अबू बकर (रजि.) यांना पाठलाग करून पकडण्यात यावे. त्यांनी सर्व मोक्याच्या जागांवर सशस्त्र पहारेकरी तैनात केले. जाहीर करण्यात आले की, जी व्यक्ती दोहोंना वा दोहोपैकी एकास जिवंत व मृत अवस्थेत घेऊन येईल त्याला प्रत्येकी शंभर उंट बक्षीस म्हणून दिले जातील.

ही घोषणा ऐकताच पदचिन्ह ओळखणारे निष्णात लोक मोठ्या उत्साहाने शोध करू लागले व पाठलाग करत करत सौर गुफेच्या मुखाजवळ पोहचले. अल्लाहने मदत केली. माननीय अबू बकर (रजि.) म्हणाले, ''हे अल्लाहचे पैगंबर! जर यांच्यापैकी कोणी खाली वाकून पाहिले तर तो आम्हास शोधून काढील.''

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''अबू बकर (रजि.) शांत राहा, आम्ही दोघे आहोत आणि तिसरा अल्लाह आहे. (आपल्या सोबत अल्लाह आहे.)''

आणि खरोखर चमत्कार घडला. पैगंबर मुहम्मद (स.) व त्यांना शोधणाऱ्यांदरम्यान केवळ काही पावलांचे अंतर होते, पण शोध करणारे तेथूनच परत गेले.

# मदीना शहरात आगमन

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) हे मक्का येथून मदीना शहराकडे रवाना झाले. ही बातमी मदीनावासीयांपर्यंत लगेच पोहचली. सर्वांना आनंद झाला. लोक त्यांच्या आगमनाची आतुरतेने वाट बघत होते. एक दिवस अचानक एका टेकडीवरून कोणीतरी उंच आवाजात गावकऱ्यांना हाक दिली, ''लोकहो, ज्यांची तुम्ही प्रतीक्षा करीत होता ते थोड्याच वेळात मदीनेच्या हद्दीत प्रवेश करणार आहेत. रबी उल अव्वलची आठ तारीख अर्थात २० सप्टेंबर इ. सन. ६१२ चा दिवस होता. लोकांनी आनंदोल्हासाने घोषणा दिली, 'अल्लाहु अकबर'. मदीनापासून तीन मैलाच्या अंतरावर कुबा नावाचे एक स्थळ आहे. तेथे प्रतिष्ठित मुस्लिमाची घरे होती. पैगंबर मुहम्मद (स.) १४ दिवसांपर्यंत त्यांच्याकडे अतिथी म्हणून राहिले. सरदार कुलसुम बिन हिदम हे त्यांचे यजमान होते. तेथे त्यांनी एका मशिदीची पायाभरणी केली व मशीद उभारण्यात स्वत: सहभागी झाले. तेथे त्यांनी शुक्रवारची नमाज अदा केली व अत्यंत प्रभावशाली खुत्बा (प्रवचन) ही दिला. माननीय अली (रजि.) येथेच मुहम्मद (स.) यांना येऊन भेटले. त्यांनी कळविले की, त्यांच्याकडील सर्व चीजवस्तू संबंधित लोकांना पोहचविल्या गेल्यात.

चौदा दिवसांच्या मुक्कामानंतर शुक्रवारची नमाज अदा केल्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यसरिबला रवाना झाले. त्याच दिवसापासून यसरिबचे नाव बदलून 'मदीनतुर्रसूल' (रसूल यांचे नगर) करण्यात आले. मात्र नंतर त्यास मदीना हे संक्षिप्त नाव प्राप्त झाले.

हा एक ऐतिहासिक दिवस होता. कुबा ते मदीना, मदीनावासी अंसार (मदत करणारे) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या स्वागतासाठी दुतर्फा उभे होते. सर्वजन 'अल्लाहो अकबर'च्या घोषणा देत होते. अंसारांच्या मुली डफ वाजवून स्वागतगीत गात होत्या. प्रत्येक मदीनावासी अंसारची इच्छा होती की, पैगंबरांनी त्यांच्याकडे विश्राम करावा. जो तो त्यांच्या सांडणीची लगाम पकडण्याचा प्रयत्न करीत होता. पैगंबर त्यांना सांगत, ''सांडणीला सोडून द्या, तिला अल्लाहने नियुक्त केले आहे!''

त्यांची सांडणी स्वत:हून माननीय अबू अय्यूब अंसारी यांच्या घरासमोर जमिनीवर विराजमान झाली. यजमानी श्रेय त्यांना प्राप्त झाले. माननीय अबू अय्यूब अंसारी (रजि.) यांनी लगेच त्यांचे सामान उचलले व त्यांना आपल्या घरात नेले. त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांची भरपूर सेवा व आदरातिथ्य केले. काही दिवसांनंतर त्यांचे कुटुंबीयसुध्दा मदीना येथे पोहचले. मात्र त्यांची एक सुकन्या माननीय जैनब यांना अबुल आस याने मक्काहून निघू दिले नाही. बऱ्याच दिवसांनंतर त्या मदीना येथे आल्या.

# मस्जिद-ए-नबवीची निर्मिती

माननीय अबू अय्यूब अंसारी यांच्याकडे मुक्कामाला असताना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मस्जिद-ए-नबवीचे बांधकाम सुरू केले. निर्माणकामात ते स्वतः सहभागी होत. ते स्वतः त्याकरिता दगड विटा उचलून आणत. त्याप्रसंगी ते म्हणत असत, ''हे अल्लाह! खरा मोबदला तर मरणोपरांत मिळणार आहे! तू आश्रयदाते (अंसार) व आश्रित (मुहाजिर) यांच्यावर कृपा कर!''

पैगंबरांनी मशिदीच्या शेजारी कच्च्या विटा व मातीने काही खोल्या (हुजरे) निर्माण केल्या, ज्यांचे छप्पर खजूरच्या झाडाच्या झापांनी तयार केले होते. पैगंबर मुहम्मद (स.) सात महिने माननीय अबू अय्यूब अन्सारी (रजि.) यांच्याकडे राहिल्यानंतर हुजऱ्यात राहू लागले. त्यांच्या शेजारी सधन अंसार राहत होते. ते त्यांच्याकरिता दूध पाठवून देत असत. कधी कालवण तर कधी इतर खाद्यपदार्थ पाठवून देत. त्यातच त्यांच्या भोजनाची व्यवस्था होत असे.

मदीनामध्ये ख्यातनाम औस व खजरज जमातीचे लोक राहत होते. त्यांच्यापैकी सर्वांनी इस्लाम स्वीकारला होता. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांच्यात व मुहाजिरां (आश्रितां) मध्ये भाऊबंदासारखे संबंध निर्माण करून टाकले होते. एके दिवशी सर्व अंसार व मुहाजिरांना एकत्र करून त्यांना संबोधिले,

''हे मुहाजिर (आश्रित) तुमचे भाऊ आहेत.'' नंतर ते एका अंसारी व एका मुहाजिरला बोलावित व सांगत, ''तुम्ही दोघे भाऊ भाऊ आहात.''

आता ते खरोखर भाऊ भाऊ झाले होते. त्यांच्यामध्ये एकमेकांबद्दल सहानुभूति व प्रेम एवढे वाढत गेले की वाटे जणू त्यांच्यात चढाओढ होत आहे. कधीकधी तर चिठ्ठ्या टाकून निश्चित करण्यात येत असे की कोणी जास्त मदत केली. त्यांनी आपल्या मिळकतीचे वाटप करून टाकले होते. अंसार आपल्या आरामापेक्षा त्यांच्या आरामाकडे जास्त लक्ष देत असत. एक अंसारी आपल्या मुहाजिर भावाला म्हणे, ''माझा निम्मा माल तुम्ही घेऊन टाका.'' मुहाजिर उत्तर देत, ''अल्लाह करो नि तुमच्या मिळकतीत अधिक भर पडो. कृपया मला बाजाराची वाट दाखवा.''

मुहाजिर कष्टाळू होते. संधी मिळताच कोणी व्यापार करू लागले, तर कोणी अंसाराच्या शेतीत काम करू लागले. अल्लाहने त्यांना सुयश दिले. ते लवकरच स्वावलंबी झाले. मुहाजिर व अंसारांमध्ये इतके घनिष्ट प्रेमसंबंध निर्माण झाले की, जितके नात्यागोत्यात नसतात.

काही मुस्लिम फारच गरीब होते. त्यांच्या राहण्याकरिता जागा नव्हती. ते कोणताच उद्योगधंदा करू शकत नव्हते. ते कधीकधी उपाशीपोटी राहत असत. पैगंबर मुहम्मद (स.) त्यांची मदत करत असत. बैतुलमाल (धनकोश) मधून त्यांना पैसे देत असत. मस्जिद-ए-नबवीशेजारी एक चबुतरा (ओटा) होता. त्यावर ते झोपत असत. ते 'असहाबे-सुफ्फा' (चबुतरेवाले) म्हणून ओळखले जातात. माननीय अबू हुरैरा (रजि.) त्यांपैकीच एक होते.

# युध्दाची परवानगी

मक्का येथील मुस्लिमांवर कुरैशांकडून जुलूम व अत्याचार होत राहिले व ते मुकाट्याने सहन करीत राहिले. जेव्हा अत्याचाराची हद्द झाली व मक्का येथे राहणे अशक्य झाले, तेव्हा अल्लाहने मुस्लिमांना मदीना जाण्याचा आदेश दिला. मदीनेत मुस्लिमांची स्थिती मजबूत होत असल्याचे पाहून विरोधकांचा जळफळाट होऊ लागला. त्यांनी मुस्लिमांना कमकुवत करण्याचे ठरविले. ते मदीना शहरावर हल्ला करण्याची योजना तयार करू लागले. जेव्हा सअद बिन मआज (रजि.) उमरा करण्यासाठी मक्केस गेले तेव्हा त्यांनी मुस्लिमांना त्यांच्यामार्फत कळविले की, ''तुम्ही येथून सुरक्षित मदीनेला पोहचलात म्हणून घमेंड दाखवू नका. आम्ही यसरिब (मदीना) ला येऊन तुम्हाला उद्‌ध्वस्त करून टाकू.'' कुरैश यांनी मुस्लिमांना हज व उमरा करण्यावर बंदी घातली होती. मुस्लिमांच्या जमिनी व इतर मिळकती त्यांच्या ताब्यातून निघून गेल्या होत्या. पैगंबर मुहम्मद (स.) यांना कुरैश यांच्या दुष्ट योजनांची जाणीव झाली होती. नंतर पैगंबर स्वत: रात्रभर जागे राहून पहारा देत किंवा सहकाऱ्यांना पहाऱ्यावर तैनात करून झोपत.

अल्लाहने अशा कठीण परिस्थितीत युध्दाची परवानगी दिली व म्हटले,

''आणि तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या लोकांशी लढा जे तुमच्याशी लढतात परंतु अतिरेक करू नका. अल्लाहला अतिरेक करणारे आवडत नाहीत. आणि त्यांच्याशी युद्ध करा जिथे कुठे तुमचा त्यांच्याशी सामना होईल. आणि त्यांना त्या ठिकाणाहून हाकलून लावा जिथून त्यांनी तुम्हाला हाकलले होते हे यासाठीच की जरी हत्या करणे वाईट असले तरी उपद्रव करणे हे त्यापेक्षाही वाईट आहे. पवित्र काबागृहाच्या निकट जोपर्यंत ते तुमच्याशी युद्ध करणार नाहीत तोपर्यंत तुम्हीही त्यांच्याशी युद्ध करू नका. परंतु जेव्हा ते युद्ध करतील तेव्हा तुम्हीही त्यांच्याशी युद्ध करा. द्रोह करणाऱ्यांसाठी हीच शिक्षा आहे. नंतर जर ते (युद्धापासून) परावृत्त झाले तर अल्लाह क्षमावंत व कृपावंत आहे. आणि जोपर्यंत उपद्रव नष्ट होऊन अल्लाहचाच धर्म प्रस्थापित होत नाही तोपर्यंत त्यांच्याशी युद्ध करा. मात्र जर ते परावृत्त झाले तर लक्षांत ठेवा की अत्याचाऱ्यांशिवाय कुणाशीही शत्रुत्व उचित नाही.'' *(दिव्य कुरआन, २:१९०-१९३)*

# प्रथम निर्णायक युध्द

पैगंबर मुहम्मद (स.) यांना सूचना मिळाली की, अबू सुफियान सीरियाहून कुरैशांचा एक व्यापारी काफला घेऊन मक्का शहराकडे जात आहे. पैगंबरांनी आपल्या सहकाऱ्यांना त्यांच्याशी मुकाबला करण्याचे आदेश दिले, मात्र विशेष कोणतीच तयारी न करता, कारण त्यांचा मुकाबला एका व्यापारी काफल्याशी होता. ती काही सैनिक तुकडी नव्हती. दुसऱ्या बाजूने अबू सुफियानने मक्का येथील लोकांना निरोप पाठविला की, त्यांनी काहीही करून आगेकूच करणाऱ्या मुस्लिमांना थोपवून धरावे. माननीय सअद बिन मआज (रजि.) यांनी उमराच्या वेळी कुरैशांना दटावून सांगितले होते,

''ऐका, अल्लाहची शपथ, तुम्ही जर आम्हाला काबागृहाजवळ जाण्याची बंदी घातली तर आम्ही तुमच्या अशा वाटेवर अडथळे निर्माण करू जे तुम्हाला फार महाग पडतील.'' (अर्थात मदीनाजवळून जाणारा व्यापारी मार्ग.)

कुरैश ९५० लोक बरोबर घेऊन निघाले. त्यांच्याकडे १०० घोडे व ७०० उंटही होते. पायदळ लोखंडी शस्त्राने सज्ज होते. याशिवाय त्यांच्याकडे १०० कवचही होते. सोबत काही स्त्रिया होत्या ज्या पैगंबरांविषयी अश्लील व अपमानजनक गाणी गात होत्या व सैनिकांना प्रोत्साहन देत होत्या. याविरुध्द केवळ ३१३ मुस्लिम होते. त्यांच्या सेनेत केवळ २ घोडे होते. एक जुबैर बिन अव्वाम (रजि.) यांचा, दुसरा मिकदाद बिन असवद कुंटी यांचा ७० उंट होते ज्यावर आलटून पालटून मुस्लिम सवारी करीत होते. सेनापति व साधारण शिपायात कोणताच फरक नव्हता. एका उंटावर माननीय अली (रजि.), माननीय मरसद (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) आलटून पालटून स्वार होऊन प्रवास करीत होते. जिहादची पताका (ध्वज) मुसअब इब्ने उमैर यांच्या हातात होती. मुहाजिरांचा ध्वज माननीय अली यांच्या हातात तर अंसारांचा ध्वज सअद बिन मुआज (रजि.) यांच्या हातात देण्यात आला होता.

जेव्हा अबू सुफियान यास सूचना मिळाली की, इस्लामी सेना आगेकूच करीत आहे तेव्हा तो समुद्र तटाच्या दिशेला आला आणि तो निश्चिंत झाला की आता त्यांना धोका नाही व काफिला सुरक्षित झाला आहे. त्याने कुरैशना संदेश पाठविला की, ''तुम्ही परत जा, कारण तुम्हाला काफिल्याच्या संरक्षणासाठी पाठविण्यात आले होते. त्या

उद्देशाची पूर्ती झाली आहे. त्याप्रमाणे कुरैश सेनेने परत जाण्याची तयारी सुरू केली, मात्र अबू जहलच्या हट्टामुळे त्यांना थांबावे लागले. तो युध्दाशिवाय परत जायला तयार नव्हता. कुरैशांच्या सेनेने बदर या ठिकाणी पोहचून दरीच्या एका बाजूस पडाव टाकला तर मुस्लिम दूसऱ्या बाजूस एकत्र झाले. याप्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असामान्य व अतुलनीय सैनिक नेतृत्वाचे कौशल्य प्रगट केले. पैगंबरांनी युद्धाची व्यूहरचना केल्यानंतर तंबूत प्रवेश केला व अल्लाहची प्रार्थना केली.

"हे अल्लाह! जर आज तू या थोड्याशा लोकांना नष्ट होऊ दिले तर या धरतीवर पुढे कोणीही तुझी उपासना करणार नाही. हे अल्लाह! ज्या गोष्टीचे मला तुझ्याकडून वचन मिळाले आहे आज ते पुरे कर, हे अल्लाह तुझ्या मदतीची गरज आहे."

पैगंबर मुहम्मद (स.) यांना चांगलीच जाणीव होती की मुस्लिमांचे संख्याबळ कमी व कमजोर आहे. विरोधकांची बाजू अधिक सशक्त आहे. तुलनात्मकदृष्ट्या संख्या व शक्तीच्या बाबतीत त्या दोघांत बरीच तफावत होती. अल्लाहच्या मदतीने सत्याचा विजय झाला. कुरैशांना पराजयामुळे मोठा धक्का बसला. त्यांचे ७० सैनिक मारले गेले व जवळजवळ तेवढेच पकडले गेले.

त्या काळात युध्दकैद्यांशी फारच वाईट वर्तन केले जात असे. त्यांना कष्ट दिले जात असत व त्यांचा विविध प्रकारे अपमान केला जाई. मात्र पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या वाईट प्रथेला विराम दिला. कैद्यांना सन्मानजनक वागणूक देण्यात आली. त्यांना मदीनेतील बऱ्याचशा घरांत ठेवण्यात आले. पैगंबरांनी आपल्या सहकाऱ्यांना निर्देश दिले की, "कैद्यांना चांगले भोजन द्या, चांगले कपडे द्या." या आदेशानुसार सहकाऱ्यांनी स्वत: खजूर खाऊन भूक भागविली मात्र कैद्यांना चांगले भोजन दिले. ज्यांच्याकडे परिधान करण्यास वस्त्र नव्हते त्यांना वस्त्र दिले. नंतर काही मोबदला घेऊन त्यांना मुक्त करण्यात आले. पैगंबरांनी कैद्यांना मुक्त करताना अशी प्रस्ताववजा अट मांडली की, जे कैदी मुलांना शिक्षण देऊन त्यांना साक्षर करतील त्या कैद्यांना मुक्त करण्यात येईल. यावरून इस्लाममध्ये शिक्षणाला किती महत्त्व आहे हे स्पष्ट होते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे मानवतेवर इतके मोठे उपकार आहेत की ते कधीच विसरता येणार नाही. त्यांनी जे आदर्श व नियम लोकांपुढे मांडले ते प्रत्यक्ष अमलात

आणून दाखविले. त्यांनी युध्द काळात स्त्रिया, मुले, वृध्द, विकलांग, युध्दाशी संबंध नसलेले, उपासनागृहात आढळलेले संन्यासी, विरक्त व पुजाऱ्या (पुरोहिता) ची हत्या केली नाही व छळलेही नाही. तसेच विनाकारण वृक्ष तोडण्याची व शेतांतील पिकांचा नाश करण्याची मनाई करण्यात आली होती. त्यांनी आदेश दिला होता की, युध्द चालू असताना सैनिकाने इस्लामचा कलेमा (इष्टवचन अर्थात 'लाइलाहा इल्लल्लाह मुहम्मदुर्रसूलल्लाह') उच्चारल्यास त्याचा वध करण्यात येऊ नये व नंतर त्याच्या बाबतीत आवश्यक चौकशी केली जावी. त्यांनी अशीही समज दिली की, जर शत्रूच्या एखाद्या व्यक्ती वा समूहास मुस्लिमांकडून एखाद्या सामान्य व्यक्तीने शरण दिली तर ती संपूर्ण सेनेकडून दिलेली शरण मानली जाईल. पैगंबरांचा आदेश होता की, शत्रूपक्षाच्या सैनिकांच्या मृतदेहांचा अनादर करता कामा नये. मृतदेहाचे नाक कान कापून चेहरा विद्रूप केला जाऊ नये.

बदरच्या युध्दाने विरोधकांमध्ये मानसिक दुबळेपणा निर्माण झाला. त्यांना माहीत झाले की, आता तराजूचे पारडे कोणत्या बाजूला कलतेय. पराजयाने त्यांची प्रतिष्ठा व अब्रू वेशीवर टांगली गेली होती. कुरैश फार दु:खी झाले होते. इस्लामच्या कट्टर विरोधकांपैकी काही लोकांनी इस्लाम स्वीकारला. मदीनेतले ज्यू धर्मीय मुस्लिमांशी प्रभावित होऊ लागले होते. मक्केतील विरोधक व मदीनेतील ज्यू दोहोंना मुस्लिमांबद्दल ईर्षा व द्वेष वाटू लागले होते. बनू कैनुकाअ ज्यू वंशाच्या लोकांनी केलेला करार मोडला आणि मुस्लिमांशी लढाई केली व मुस्लिमांना कष्ट दिले. मदीना येथे राहणारे काही लोक त्यांना साथ देत होते. ते नावापुरते मुस्लिम झाले होते. ते अब्दुल्लाह बिन उबई व त्यांचे साथीदार होते. या सर्वांव्यतिरिक्त एक चौथा गट होता जो मदीना वसाहतीच्या चारी बाजूला राहत होता. ते लोकही मुस्लिमांचे शत्रू होते. त्यांना धार्मिक तत्त्वांशी काही देणेघेणे नव्हते. ते लुटारू होते व वाटसरूंना लुटणारी टोळी होती. त्यांच्या मनात शंका निर्माण झाली होती की जर मदीनामध्ये इस्लामी राज्याची स्थापना झाली तर त्यांच्या लुटमारीचा व्यवसाय व इतर वाईट कृत्यांना आळा बसेल.

अशा तऱ्हेने चारी बाजुंनी मुस्लिम, शत्रूंच्या कचाट्यात घेरले गेले होते.

# अन्य युद्धे

बदरच्या युध्दात पराजित झाल्यानंतर कुरैश शांत झाले नाहीत. उलट युध्दाची धमकी देऊ लागले. ते मदीनावर जबरदस्त हल्ला करून मुस्लिमांचे नुकसान करण्याची योजना आखत होते. त्याप्रमाणे त्यांनी युध्दाची तयारी सुरू केली. युध्दास कारणीभूत ठरलेला व्यापारी माल अबू सुफियानने युध्दाच्या तयारीसाठी विकून टाकला. त्या मालाची किंमत साधारण १,००० उंट व ५०,००० दीनार होती. सेनेची तयारी रात्रंदिवस चालू होती. सैन्यभरतीचे काम सुरू होते. शस्त्र व इतर युध्दसामुग्री एकत्रित केली जात होती. त्यांनी बऱ्याच जमाती, टोळ्या टोळक्यांशी संगनमत केले होते. अल्पकाळातच चांगले मोठे सैन्य उभारले गेले. शस्त्रास्त्र व इतर सामानाचे ढीग लागले. वर्षभरात ३,००० सैनिकांची भरती झाली, त्यात १५ महिलाही होत्या. कुरैश यांनी अबू सुफियान यांना सरसेनापती व खालिद बिन वलीद यांना सेनापती म्हणून नियुक्त केले. इकरिमा बिन अबू जहलला साहाय्यक सेनापती नियुक्त करण्यात आले. प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांचे काका माननीय अब्बास (रजि.) यांनी इस्लाम स्वीकारला होता मात्र ते मक्का येथेच राहत होते. त्यांनी एका घोडेस्वारास मदीनाकडे पाठविले व मुहम्मद (स.) यांना कळविले की, ''कुरैश युध्दासाठी मदीनेकडे रवाना होणार आहेत. ते भलेमोठे सैन्य घेऊन येत आहेत.'' केवल तीन दिवसांत संदेश मदीनेला पोहचला. त्या वेळी पैगंबर मस्जिद-ए-कुबामध्ये होते. ते लगेच मदीनेला गेले. इतके मोठे सैन्य व शस्त्रसामुग्री कुरैश यांनी तयार केल्याचे त्यांना आश्चर्य वाटले. त्यांचे मत होते की, मुस्लिमांनी मदीनेतच राहावे व कुरैश यांनी हल्ला केल्यास त्यांचा मुकाबला करण्यात यावा. अब्दुल्लाह बिन उबई याने सहमती दर्शविली, मात्र जे मुस्लिम बदरच्या लढाईत सामील होऊ शकले नव्हते, बोलू लागले,

''हे अल्लाहचे पैगंबर! तुम्ही मदीनेबाहेर निघून शत्रूंशी युध्द करा. शत्रूला वाटायला नको की आम्ही घाबरून गेलो आहोत व भीतीने कमकुवत झालो आहोत त्यामुळे बाहेर यायला घाबरत आहोत.''

हे ऐकूण पैगंबर मुहम्मद (स.) घरात गेले व कवच धारण करून बाहेर आले. हे पाहून लोकांना पश्चात्ताप झाला ते म्हणाले,

''हे अल्लाहचे पैगंबर! आम्ही आपणास आपल्या इच्छेविरुध्द या कामाकरिता तयार केले आहे. आम्ही असे करायला नको होते. आपली इच्छा असेल तर येथेच राहून त्यांच्याशी मुकाबला करू.''

यावर पैगंबरांनी उत्तर दिले,

''मी उगारलेले अस्त्र, युध्दापूर्वीच खाली ठेवणे मला शोभणारे कृत्य नाही.''

शुक्रवार ६ शव्वाल हिजरी सन ३ रोजी शुक्रवारच्या नमाजनंतर (दुपारी) एक हजार मुजाहिदीन (सैनिकांना) सोबत घेऊन ते युध्दासाठी रवाना झाले. माननीय इब्ने उम्मे मकतूम (रजि.) यांना त्यांच्या मागे नायक नेमले. जेव्हा ही सेना मदीना व उहुद पर्वताच्या मध्याभागी शौत या ठिकाणी पोहचली तेव्हा अब्दुल्लाह बिन उबई ३०० सैनिकांना घेऊन इस्लामी सेनेपासून वेगळा झाला. त्याने सांगितले की, ''आमचा सल्ला मानला गेला नाही म्हणून आम्ही साथ द्यायला तयार नाही.'' आता फक्त ७०० लोक उरले होते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उहुद पर्वताच्या पायथ्याशी (मदीनापासून ३ किलो मीटर अंतरावर) पडाव टाकला. त्यांनी सैन्याची अशी रचना केली की, उहुद पर्वताकडे त्यांची पाठ होती. त्यांनी निर्देश दिले की, ''जोवर ते आदेश देणार नाहींत युध्द सुरू करण्यात येऊ नये.'' त्यांनी उहुद पर्वताच्या मागे पर्वताच्या दरीवर नजर ठेवण्याकरिता ५० धनुष्यधारी सैनिक तैनात केले. त्यांचे नेतृत्व अब्दुल्लाह इब्ने जुबैर यांना सोपविण्यात आले. त्यांना स्पष्ट निर्देश देण्यात आले की, धनुष्यधाऱ्यांनी शत्रूच्या घोडेस्वारांना थोपवून धरावे जेणेकरून ते पाठी मागून हल्ला करू शकणार नाहीत. कोणत्याही परिस्थितीत त्यांनी आपले स्थान सोडू नये. पैगंबरांनी धनुर्धाऱ्यांना निक्षून सांगितले की, ''आमचे काही झाले तरी आपले स्थान सोडू नका.''

कुरैशचे तीन हजार सैनिकांमध्ये ७०० कवचधारी, २०० घोडे व ३००० उंट होते. ते जबरदस्त शक्तिशाली होते. युध्द सुरू झाले. उहुद पर्वताची जमीन इस्लाम धर्मियांच्या रक्ताने रंगली गेली. धनुष्यधारी सैनिकांनी आदेशाचे उल्लंघन केल्यामुळे मुस्लिमांना जरी पराजय पत्करावा लागला व पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सामर्थ्यवान

सैनिक शहीद झाले. तरी तो ह्या दृष्टीने ऐतिहासिक विजय होता कारण इस्लामवर दृढ राहून आणि मुस्लिमांचे पैगंबर मुहम्मद (स.) वरील प्रेम व विश्वास सिद्ध झाले. हा त्यांच्यावरील आस्थेचा विजय होता. इस्लाम धर्मियांच्या शौर्य व धैर्याचा अनुपम व व्यावहारिक नमुना पाहायला मिळाला. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नेतृत्वात ७०० मुजाहिदीन (सैनिका) नी ज्या प्रकारे धर्मश्रद्धेसाठी आपल्या प्राणांची आहुती देण्यास तयार झाले तसे दुसरे उदाहरण मानवी इतिहासात कुठेच दिसून येत नाही. उहुद डोंगराची संपूर्ण जमीन पैगंबरांच्या जिवलगांच्या रक्ताने रंगून गेली. तेथेही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तित्व व त्यांच्या शिकवणीची महानता दिसून येते. कदाचित याच कारणामुळे माननीय अनस इब्ने नज्र (रजि.) यांनी म्हटले होते, "माझ्याकडे उहुद पर्वताकडून स्वर्गाचा सुगंध येत आहे!"

माननीय अनस (रजि.) सुध्दा तेथेच शहीद झाले. त्यांच्या शरीरावर ८० जखमा होत्या. माननीय हमजा (रजि.) यांनी या युध्दात अत्यंत शौर्य व वीरतेचे प्रदर्शन केले. त्यांनी शत्रूच्या सैन्यातील अनेक रथीमहारथींना धूळ चारली व स्वत:ही वीरगती प्राप्त केली. त्यांच्या शरीराचे तुकडे तुकडे करण्यात आले होते. माननीय मुसअब बिन उमैर (रजि.) सुध्दा पैगंबर मुहम्मद (स.) यांचे संरक्षण करताना हुतात्मे झाले.

उहुद पर्वताच्या पायथ्याशी माननीय अबू दुजाना (रजि.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या संरक्षणार्थ स्वत:च्या पाठीचा ढालीसारखा उपयोग केला. त्यांची पाठ बाणांनी रक्तबंबाळ झाली होती. परंतु ते जागेवरून किंचितही हालले नाही व शेवटी मृत्युला आलिंगन दिले. माननीय तलहा (रजि.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या रोखाने येणारे बाण आपल्या हाताने रोखले होते.

शत्रूसेनेने क्रौर्य व पाशवी वृत्तीचे प्रदर्शन केले. तरीही सत्यमार्गी मुस्लिम ध्वजधारकांच्या संकल्पवृत्ती व धैर्यावर त्याचा परिणाम घडून आला नाही. ते अधिक धैर्यशाली झाले. माननीय जियाद बिन सकन (रजि.) यांच्या तडफडणाऱ्या शरीराला पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सांगण्यावरून त्यांच्याजवळ आणले गेले, तेव्हा त्यांनी आपला चेहरा (गाल) त्यांच्या पवित्र चरणांवर रगडला. इतक्यात शत्रूसेनेतील उतबा बिन अबी वक्कासने एक दगड पैगंबरांकडे भिरकावला ज्याने त्यांचा खालचा दात पडला व ओठही जखमी झाले. अब्दुल्लाह बिन कमिआने इतक्या जोरात पैगंबरांवर

वार केला की, त्यांच्या स्वत:च्या कवचाच्या दोन सळ्या गालात शिरल्या, डोक्यावरही घाव झाला. जखमी ओठातून रक्त वाहू लागले. रक्ताने चेहरा माखला गेला. पैगंबर रक्ताळलेला चेहरा हाताने पुसत व बोलत राहिले,

"ते लोक कसे यशस्वी होतील ज्यांनी आपल्या पैगंबराचा चेहरा रक्ताने माखून टाकला आहे. पैगंबर तर त्यांना त्यांच्या पालनकर्त्यांकडे येण्याचे आवाहन करीत आहे."

या युध्दात पैगंबर मुहम्मद (स.) शहीद झाले अशी अफवा पसरविण्यात आली. त्यामुळे बऱ्याचशा साथीदारांचे धैर्य खचले गेले. या युध्दात ७० मुस्लिम हुतात्मे झाले. त्यात अत्यंत बलवान-शक्तिमान सहाबा (साथीदार) ही होते. तो मुस्लिमांकरिता मोठा कठीण दिवस होता. युध्द थांबले तेव्हा त्यांच्या शरीरावर जख्मा दिसत होत्या. तरीही त्यांचे धैर्य खचले नव्हते. शत्रूपक्षातील यहुदी व मुनाफिक (नामधारी-फितूर मुस्लिम) आनंदात होते. पैगंबरांनी विचार केला की, शत्रूला असे वाटायला नको की मुस्लिम परास्त झालेत. पुन्हा हल्ला करण्यास उत्साहित करण्यासाठी म्हणून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांना उद्देशून विचारले, "शत्रूचा पाठलाग कोण करेल?"

मुस्लिम फारच कमजोर झाले होते तरी त्यांनी हमरा-उल असदपर्यंत अबू सुफियानचा पाठलाग केला. ते स्थान मदीना पासून ८ मैलाच्या अंतरावर आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) शनिवार दिनांक ७ शव्वाल सन ३ हिजरी रोजी सायंकाळी मदीनाला परत पोहचले.

मदीना येथील ज्यू लोकांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याबरोबर झालेले करार मोडले होते. ज्यू धर्मिय नेतागण व विद्वान इस्लामच्या वाढत्या शक्तीने असंतुष्ट होते. मुस्लिमांशी त्यांचा मुकाबला झाला होता. त्यांनी मक्काच्या लोकांशी हातमिळवणी करून जबरदस्त हल्ला करण्याची योजना आखली. फलस्वरूपात एक सैनिक करार करण्यात आला, ज्यात कुरैश, ज्यू व गतफान जमातीचे लोक सामील झाले. काही अटी व शर्तीही निश्चित करण्यात आल्या. या करारानुसार एकत्रित सेनेत गतफान जातीचे ६,००० सैनिक सामील होतील असे ठरले. त्याच्या मोबदल्यात ज्यू गतफान यांना खैबरच्या बगिचातले पूर्ण वर्षाचे पीक देऊ करतील.

कुरैश यांचे ४,००० सैनिक एकत्रित सेनेत सामील होतील असे ठरले. १० हजार सैनिकांच्या सेनेचा अबू सुफियान यास सेनापति म्हणून नियुक्त करण्यात आले. पैगंबर मुहम्मद (स.) यांना अगोदरच सूचना मिळाली होती. याबाबत सल्लामसलत करण्यात आली. मदीना येथे राहूनच सुरक्षात्मक लढा देण्याचे ठरविण्यात आले. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे ३,००० सैनिक होते.

या प्रसंगी माननीय सलमान फारसी (रजि.) यांनी मदीनाच्या उत्तरेकडील प्रशस्त भागाकडे खंदक खणण्याची सूचना मांडली. त्यांची सूचना मान्य करण्यात आली व खंदक खणण्याचे काम सुरू करण्यात आले. मुहम्मद (स.) स्वतः या कामात सामील झाले. माननीय अबू तलहा (रजि.) म्हणतात, ''मी अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे भूक लागल्याबद्दल सांगितले व पोट उघडे करून दाखविले ज्यावर एक दगड बांधलेला होता. ते पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वतःच्या पोटावरून वस्त्र सरकविले व आम्ही पाहिले की त्यांच्या पोटावर दोन दगड बांधलेले होते. (अरब लोक उपाशी असताना सरळ उभे राहण्यासाठी पोटावर दगड बांधून घेत.) मोठ्या कष्टाने खंदक खणला गेला. ही इराणी युध्दनीती होती जी अरबांना माहीत नव्हती. यामुळेच शत्रूसेना जेव्हा खंदकाजवळ पोहचली तेव्हा क्रोधाने चकरा मारू लागली. मदीनावर हल्ला करणे केवळ उत्तरेकडून शक्य होते. मात्र मध्येच खंदक खणले गेले असल्यामुळे ते अशक्य झाले होते. मदीना नगरच्या तिन्ही बाजूंस डोंगर, पठार व खजूरच्या बागा होत्या. शेवटी कुरैशने कुरैजा जमातीच्या ज्यूंना मुस्लिमांवर मांगून हल्ला करण्याची कामगिरी सोपविली. त्यांनी होकार दिला, परंतु त्यांचा कट असफल झाला. शत्रूसेनेने मदीना नगरास एक महिना वेढा घातला होता. त्यांना खंदक पार करता आले नाहीत. त्यांना रसदही मिळू शकत नव्हती, कारण मुस्लिमांच्या एका तुकडीने येणाऱ्या रसदीच्या पहिल्या खेपेवर कब्जा करून घेतला होता. थंडी असह्य होती. एके रात्री अचानक वादळी वारे वाहू लागले. शत्रूंचे तंबू उडून गेले. जेवणाचे पातेले उलटे झाले. जनावरे पळू लागली. शत्रूसैन्य गोंधळून गेले व पळू लागले. सकाळ होता होता मैदान रिकामे झाले.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळात आणखी काही छोटी-मोठी युद्धे झाली त्यापैकी काही युद्धांत मुहम्मद (स.) स्वतः सामील होते.

# हुदैबियाचा करार

काबा इस्लामचे मूळ केंद्र आहे. परंतु मुस्लिमांना हे केंद्र सोडून सहा वर्षे उलटून गेली होती. म्हणून मुस्लिमांची मनस्वी इच्छा होती की, त्यांना काबागृहाची प्रदक्षिणा करण्याची संधी मिळावी. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या आशयाचे एक स्वप्न पाहिले व त्यांनी उमरा करण्याची (काबागृहाची प्रदक्षिणा करण्याची) घोषणा केली. त्यांचे सहकारीही तयार झाले. ते सोमवार दि. १ जिल्कद सन ६ हिजरी आपल्या सांडणी कसबावर स्वार होऊन मक्कासाठी रवाना झाले. सोबत त्यांची पत्नी उम्मे सलमा (रजि.) व दुसरे साथी होते. तलवारी म्यानमध्ये होत्या व इतर कोणतेच हत्यार घेतले नव्हते. जुलहुलैफला पोहचल्यानंतर जनावरांना चिन्हांकित करण्यात आले. घोषणा देण्यात आली की, मुस्लिम काबागृहाच्या दर्शनासाठी निघाले आहेत. युध्द व हल्ला करण्याचा मुळीच उद्देश नाही. मार्गातच बशीर इब्ने सुफियानने पैगंबर मुहम्मद (स.) यांना सूचित केले, की कुरैशांचा निर्णय आहे की मुहम्मद (स.) यांना मक्का नगरात प्रवेश करण्याची मनाई आहे व ते लोक युध्दासाठी सज्ज आहेत.

ही सूचना मिळाल्यानंतरही पैगंबर मुहम्मद (स.) यांनी प्रवास रद्द न करता हुदैबिया या स्थानापर्यंत जाऊन तेथे पडाव टाकला. मक्का नगराजवळ हुदैबिया नावाची एक विहीर आहे व त्याच नावाचे एक गावही आहे. प्रिय पैगंबरांनी खिराश बिन उमैया खुजाई यांना मक्कावासीयांशी वार्तालाप करण्यासाठी पाठविले. मक्कावासीयांनी त्यांचा उंट मारून टाकला व खिराश यांना ठार करण्याचा प्रयत्न केला. मात्र नंतर त्यांना सोडून देण्यात आले. नंतर माननीय उस्मान (रजि.) यांना पाठविण्यात आले. कुरैश काही केल्या मुस्लिमांना काबागृहाची प्रदक्षिणा करू देण्यास राजी होत नव्हते. मात्र सुहैल बिन अम्र यांना प्रतिनिधी म्हणून पाठविल्यानंतर दोन्ही पक्षांत बैठक करून करारनाम्याच्या अटी निश्चित झाल्या. हा एक ऐतिहासिक करार होता ज्यात मुहम्मद (स.) स्वत: सामील होते. या कराराच्या अटी अशा होत्या,

१) दहा वर्षांपर्यंत दोन्ही पक्षांत युध्दबंदी लागू राहील. कोणीही एकमेकांवर हल्ला करणार नाही.

२) मुस्लिम या वर्षी परत जातील व पुढील वर्षी काबाच्या दर्शनासाठी येतील. तीन दिवस मुक्काम करतील व तलवारी म्यानात ठेवतील.

३) कुरैश यांचा कोणताही माणूस सरदाराच्या (प्रमुखाच्या) अनुमतीशिवाय (पळून

येऊन) मुहम्मद (स.) यांच्याकडे आल्यास त्याला मुहम्मद (स.) परत पाठवतील. परंतु मुहम्मद (स.) यांच्या साथीदारांपैकी कोणी व्यक्ती संरक्षणासाठी कुरैश यांच्याकडे गेल्यास कुरैश त्याला परत पाठविणार नाहीत.

४) मुहम्मद (स.) यांच्या साथीदारांपैकी जी व्यक्ती हज व उमरासाठी मक्का नगरात येईल त्याच्या जीविताची व वित्ताची सुरक्षा केली जाईल व कुरैश यांचा माणूस इजिप्त किंवा मदीना मार्गाने प्रवास करील त्याच्या जीविताची व मालमत्तेची सुरक्षा केली जाईल.

५) अरबांना मुस्लिम वा कुरैश यांच्यापैकी कोणाशीही करार करण्याचा अधिकार राहील.

यातील काही अटी मुस्लिमांच्या विरुध्द होत्या व हा करार मुस्लिमांनी दबावाखाली येऊन केल्यासारखे वाटत होते. हा करार पूर्ण झाला नव्हता तेवढ्यात सुहैल यांचे पुत्र अबू जन्दल (रजि.) साखळ्यांनी जकडलेल्या अवस्थेत बाहेर आले. (त्यांनी इस्लाम स्वीकारला होता) त्यांनी निवेदन केले, ''हे अल्लाहचे पैगंबर! मला शत्रूंच्या तावडीतून सोडवून स्वत:बरोबर घेऊन चला.'' सुहैल यांनी अबू जन्दल यांना पाहताच आग्रह केला की, ''करारानुसार त्याला परत पाठवून द्या.'' मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले, ''अजून करारनाम्याचा मजकूर लिहिला गेला नाही. त्याला माझ्या खातर परवानगी देऊन टाका.'' सुहैल म्हणाले, ''मग करार होऊ शकणार नाही.'' यावर पैगंबरांनी त्या तरुणास परत पाठवून दिले व सांत्वन केले की, ''अल्लाह तुला मुक्त करण्याची संधी प्राप्त करून देईल.'' अबू जन्दलच्या बाबतीत घेतलेल्या निर्णयाचे मुस्लिमांनी कडाडून विरोध केला माननीय उमर (रजि.) यांनी तर पैगंबरांना म्हटले की जर आपण अल्लाहचे सच्चे पैगंबर आहात तर आम्ही असा अपमान का सहन करावा?''

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अत्यंत मृदू भाषेत त्यांना समजावून सांगितले, ''मी अल्लाहचा खरा पैगंबर आहे. त्याच्या आदेशाविरुध्द काहीच करू शकत नाही. अल्लाह माझी मदत करेल. करारनामा झाल्यानंतर, पैगंबरांनी आदेश दिला की, जनावरांचा बळी त्याच ठिकाणी करण्यात यावे व मुंडण करावे. दोन आठवडे मुक्काम केल्यानंतर हुदैबियाहून पैगंबर व त्यांचे सहकारी परत फिरले. मार्गातच कुरआनची 'सूरह फतह' अल्लाहकडून प्राप्त झाली. ज्यात करारनाम्याला 'स्पष्ट विजय' म्हटले गेले होते. सर्व सहकाऱ्यांना एकत्र बोलवून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की, ''हा आपला स्पष्ट विजय आहे.'' लोकांना आश्चर्य वाटले त्यांनी विचारले, ''हे अल्लाहचे

पैगंबर! हा कसला विजय ?'' पैगंबर म्हणाले, ''शपथ आहे मला अल्लाहची ज्याच्या ताब्यात माझे प्राण आहेत, निश्चितच हा गौरवशाली विजय आहे!'' नंतर घडलेल्या घटनांनी हे सिध्द झाले की, हा करार मुस्लिमांच्याच बाजूचा होता. माननीय उमर (रजि.) यांना त्यांनी कराराविरुध्द व्यक्त केलेल्या नाराजीबद्दल बराच काळ पश्चात्ताप झाला व त्याकरिता त्यांनी कितीतरी रोजे पाळले.

हुदैबियाच्या कराराने लोकांची मने जिंकली गेली. कुरैशचे सेनापती खालिद बिन वलीद यांनी तह झाल्यानंतर इस्लाम स्वीकारला. अल्लाहकडून त्यांना 'सैफुल्लाह' (अल्लाहची तलवार) ची उपाधी मिळाली. दुसरे सेनापती अम्र बिन आस (रजि.) यांनीही इस्लाम स्वीकारला व ते मदीना येथे निघून आले.

# साऱ्या जगाला इस्लामचा संदेश

हुदैबियाच्या तहानंतर परिस्थितीत एक प्रकारची स्थिरता निर्माण झाली. इस्लामच्या व्यापक प्रचार-प्रसारचे मार्ग मोकळे झाले. १ मुहर्रम सन ७ हिजरी (गुरूवारी) पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मशिदीत आपल्या सहकाऱ्यांना संबोधून म्हटले,

''लोक हो! अल्लाहने मला संपूर्ण जगाच्या कल्याणकर्त्याच्या स्वरूपात पैगंबर म्हणून पाठविले आहे. (माझा संदेश संपूर्ण जगाकरिता कल्याणकारी आहे.) लक्षात असू द्या, इसा (अ.) च्या साथीदारांसारखा फेरफार करू नका. जा माझ्याकडून सर्वांना सत्य संदेश पोहोचवा.''

ही इस्लामच्या आंतराष्ट्रीय आवाहनाची सुरूवात होती. त्यांनी याच भावनेने अरब व अरबस्थानाबाहेरच्या सम्राटांना, सरदारांना तसेच धनवान लोकांना पत्र लिहिले ज्यात इस्लामचा संदेश स्पष्टपणे प्रस्तुत केला गेला होता. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पत्र घेऊन जाण्यासाठी अशा लोकांची निवड केली जे सम्राट, सरदार व धनवानांच्या दर्जाला साजेशे व योग्यतेनुसार संवाद करू शकणारे होते व ज्यांना त्या देशाची भाषा व परिस्थिती अवगत होती.

खाली काही पत्रे नमुन्याखातर देण्यात येत आहेत, ज्यावरून अंदाज करता येईल की इस्लामच्या प्रचारासाठी कसे प्रयत्न करण्यात आले व त्यांचा काय परिणाम झाला.

१. रोमन सम्राट कैसर यांच्या नावे लिहिलेले पत्र :

रोमचे सम्राट कैसरच्या नावाने जे पत्र पाठविण्यात आले होते त्याचा मजकूर असा होता,

(सुरू करतो) असीम दयावान, असीम कृपावान अल्लाहच्या नावाने.

मुहम्मद यांच्याकडून जो अल्लाहचा दास आहे व पैगंबरही. हिरक्ल यांच्या नावे जो रोमचा सम्राट आहे. जो सन्मार्गाने वागेल त्यावर हजार वेळा शांती असो. (तत्पश्चात, इस्लामचा असा संदेश दिला गेला.)

''अल्लाहचे दास व्हा. त्याच्या आदेशांचे पालन करा. अल्लाह तुम्हाला

दुप्पट मोबदला देईल, मात्र तुम्ही त्याच्या आज्ञा भंग केल्यास तुमच्या राज्यातील लोकांच्या गुन्ह्यासही तुम्हीच जबाबदार व्हाल.

हे ग्रंथधारकांनो, या मी तुम्हाला त्या गोष्टीची आठवण करून देतो जी तुमच्या आमच्यात समान आहे. तुमच्याप्रमाणेच आम्हीही मानतो की अल्लाहशिवाय इतर कोणाची आराधना करू नये, कोणालाच त्याचा भागीदार मानू नये, अल्लाहशिवाय दुसऱ्या कोणास पालनकर्ता मानू नये. जर हे तुम्हास मान्य नसेल तर (आम्ही स्पष्टपणे सांगतो की) तुम्ही लक्षात ठेवा की, आम्ही अल्लाहचे दास (त्याची उपासना करणारे) व त्याच्या आज्ञांचे पालन करणारे आहोत.''

हे पत्र माननीय दह्या कलबी घेऊन गेले होते. त्यांनी ते बसरा येथील रोमच्या सम्राटाच्या वतीने सीरियावर शासन करणारे हारिस गस्सानी यांना दिले. त्याने कैसरकडे पत्र पाठवून दिले. त्यांना आदेश दिला की, अरबस्थानातील कोणी व्यक्ती राज्यात असेल तर त्याला हजर करण्यात यावे. त्याच काळात इस्लामचा सर्वांत कट्टर शत्रू अबू सुफियान व्यापारासाठी त्याच क्षेत्रात गेला होता. तो दरबारात हजर झाला. त्याच्याशी जी चर्चा झाली ती फार ऐतिहासिक महत्त्वाची आहे. यावरून अंदाज करता येईल की, इस्लामी संदेश पोहचल्यावर अरबस्थानबाहेरील लोकांची काय प्रतिक्रिया होती.

कैसर : पैगंबर होण्याचा दावा करणाऱ्याचा वंश कसा आहे ?

अबू सुफियान : त्यांचा संबंध प्रतिष्ठित वंशाशी आहे.

त्या वंशात इतर कोणी पैगंबर होण्याचा दावा केला होता काय ?

''नाही.''

त्या वंशात कोणीतरी कधी सम्राट होता काय?

''कधी नाही.''

''ज्या लोकांनी हा धर्म स्वीकारला आहे, ते धनहीन आहेत की धनवान?''

''निर्धन आहेत.''

त्याचे अनुयायी वाढत आहेत की कमी होत आहेत?

''सारखे वाढत आहेत.''

तुम्ही कधी त्याला खोटे बोलतांना ऐकले आहे काय?

''कधी नाही.''

तो दिलेले वचन भंग करतो का?

''आजपर्यंत तर तो कधी खोटे बोलताना आढळला नाही. आता एक करार झाला

आहे (हुदैबियाचा करार) आता पाहायचे आहे की तो वचनबध्द राहतो की वचनभंग करतो.''

तुम्ही कधी त्याच्याशी युध्द केले आहे?

''होय, लढलोय.''

युध्दाचा काय परिणाम झाला?

''कधी आम्ही जिंकलो, कधी त्याचा विजय झाला.''

तो काय शिकवतो?

''तो म्हणतो की, केवळ एकाच अल्लाहची उपासना करा, दुसऱ्या कोणासही त्याचा जोडीदार (व भागीदार) बनवू नका, चारित्र्यवान व्हा, सत्य बोला, आपसात एकमेकांशी दया व प्रेमाचे व्यवहार करा.''

या चर्चेनंतर कैसर म्हणाला,

''पैगंबर चांगल्या वंशातच जन्म घेतात. जर त्याच्या वशांत इतर कोणी पैगंबर होण्याचा दावा केला असता तर तो त्याच्या वंशाचा प्रभाव समजला गेला असता. जर त्याच्या वंशात कोणी सम्राट असता तर कदाचित शासक होण्याच्या लालसेमुळे तो तसा दावा करीत आहे असा निष्कर्ष निघाला असता. ज्या अर्थी हे सिध्द झाले आहे की, तो कधी खोटे बोलत नाही, मग हे कसे सांगता येईल की, त्याने अल्लाहबाबत इतका मोठा खोटा दावा केला असेल की, अल्लाहने त्याला पैगंबर म्हणून पाठविले आहे आणि हेही सत्य आहे की, प्रारंभिक पैगंबरांचे अनुयायी गरीब असतात व सत्य धर्माचा सारखा प्रसार होत जातो. हेही सत्य आहे की, पैगंबर कोणाशी खोटारड्यापणाने वागत नाही. तुम्ही म्हणता की, तो नमाज पढण्याचे, चारित्र्यवान होण्याचे व संयम बाळगण्याचे उपदेश देतो. हे जर सत्य आहे तर एक दिवस माझ्या क्षेत्रावरही त्याला कब्जा प्राप्त होईल. मला हे तर माहीत होते की, एक पैगंबर येणार आहे, मात्र तो अरबस्थानात जन्म घेईल हे माहीत नव्हते. मी जर तेथे जाऊ शकलो असतो तर त्याचे पाय धुतले असते.''

कैसरचे विचार ऐकून त्याच्या दरबारातील ख्रिस्ती धर्मगुरू व विद्वान नाराज झाले व अशी भीती निर्माण झाली की, कैसरविरुध्द ते बंड उभारतील. या भयापोटी कैसरच्या मनात निर्माण झालेली सत्याची किरणे लुप्त झाली. खरे आहे, सत्याचा स्वीकार करण्याच्या मार्गात धनसंपत्ती व सत्तेचा लोभ अडसर सिध्द होतो.

२. ईराणचा सम्राट किसराच्या नावे लिहिलेले पत्र :

ईराणचा सम्राट किसराच्या नावे लिहिलेले पत्र असे होते,

(सुरू करतो) असीम दयावान, असीम कृपावान अल्लाहच्या नावाने.

मुहम्मदकडून जो अल्लाहचा दास व त्याचा पैगंबर आहे. किसराच्या नावे जो ईराणचा सम्राट आहे.

"जो सन्मार्गाने वागेल आणि अल्लाह व त्याच्या पैगंबरावर श्रध्दा व्यक्त करील आणि साक्ष देईल की, अल्लाहव्यतिरिक्त दुसरा कोणी आराध्य नाही व संपूर्ण मानवजातीकरिता मला त्यानेच पैगंबर म्हणून पाठविले आहे, जेणेकरून मी त्यांच्या मनात त्यांच्या कृतघ्नतेच्या दुष्परिणामाचे भय निर्माण करेन, असा विश्वास बाळगणाऱ्यांवर हजारो वेळा शांती असो. तुम्हीही अल्लाहचे दासत्व स्वीकारा, (त्याचीच) आराधना करा व त्याच्याच आदेशांचे पालन करा. तुम्ही शांतीने राहाल, तसे न केल्यास अग्नीपूजा करणाऱ्या (मजूसीं) चे पाप तुमच्यावर लादले जातील."

खुसरू परवेज पत्र वाचून नाराज झाला व त्याने ते फाडून फेकून दिले. तो म्हणाला, "माझा गुलाम असून मला उद्देशून असे पत्र लिहितो!" व त्याने यमन येथील गवर्नरला आज्ञा दिली की, पैगंबरत्वाचा दावा करणाऱ्या व्यक्तीला पकडून माझ्या समक्ष हजर करावे.

३. नज्जाशी व अजीज यांच्या नावे पत्र :

अशाच आशयाचे पत्र हब्शाचे शासक नज्जाशी व इजिप्तचे सम्राट अजीज यांच्या नावे पाठविण्यात आले.

नज्जाशी यांनी उत्तर दिले,

"मी साक्ष देतो की आपणच अल्लाहचे खरे पैगंबर आहात."

मात्र इजिप्तचे सम्राट अजीज याने पत्र वाचून इस्लाम स्वीकारला नाही. परंतु पत्रवाहकाचा आदर केला आणि भेट व उपहाराच्या वस्तू देऊन परत पाठविले.

या पत्रांव्यतिरिक्त अरबस्थानातील इतर छोट्या-मोठ्या राजा-महाराजांनाही पत्र पाठविण्यात आली व त्यांचा चांगला प्रभाव पडला.

# मक्का विजय

अल्लाहने मक्कावर मुस्लिमांना विजय प्राप्त करण्याची नामी संधी उपलब्ध करून दिली. यास कुरैश स्वत:च कारणीभूत झाले. एक अशी घटना घडली की, ज्यामुळे मक्का विजयाचा मार्ग प्रशस्त झाला. हुदैबियाच्या तहानुसार, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या संरक्षणात येऊ इच्छिणारा येऊ शकत नव्हता, मात्र जी व्यक्ती कुरैश यांच्या संरक्षणात राहू इच्छित होती ती तसे करू शकत होती. म्हणून बनू बिकर जमातीचे लोक कुरैश यांच्या संरक्षणात राहिले व खुजाआ यांनी मुहम्मद (स.) यांच्या आश्रयात राहणे पसंत केले. दोन्ही जमातीत पूर्वीपासून शत्रुत्वाचे नाते होते. एकदा त्यांच्यात लढाई झाली, ज्यात कुरैशने बनू बिकर यांना शस्त्रे पुरविली. बनू बिकर खुजाआंना मागे ढकलत ढकलत काबागृहात शिरले व तेथे त्यांना ठार मारले. परिस्थितीवश अम्र बिन सालिम बिन खुजाई मदीना येथे येऊन पैगंबरांना भेटले व त्यांना या घटनेबाबत माहिती दिली आणि त्यांच्याकडून मदतीची याचना केली. हे ऐकून अल्लाहचे पैगंबर म्हणाले,

"अम्र बिन सालिम, तुम्हाला अवश्य मदत दिली जाईल." प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका व्यक्तीस मक्का येथे पाठविले व निर्देश दिले की कुरैश यांच्यासमोर तीन अटी ठेवा :

१) खुजाआचे लोक मारले गेले आहेत त्यांना (खूनबहा) क्षतिपूर्ती अदा करण्यात यावी.

२) बनू बिक्रला मदत देऊ नये.

३) हुदैबिया करार भंग झाल्याची घोषणा करण्यात यावी.

या अटी कुरैश यांच्या समक्ष प्रस्तुत करण्यात आल्या. त्यांच्या सरदारांनी म्हटले, "आम्हाला फक्त तिसरी शर्त मंजूर आहे." हुदैबिया तह समाप्त झाला. जेव्हा मक्कावासीयांना त्यांच्या चुकीची जाणीव झाली तेव्हा त्यांनी अबू सुफियान यांना मदीना येथे पाठविले व तो आपली कन्या माननीय उम्मे हबीबा (रजि.) यांच्या घरी गेला व पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या बिछान्यावर बसू लागला. माननीय उम्मे हबीबा (रजि.) यांनी ते दुमडून ठेवले व म्हटले, "हा पैगंबर मुहम्मद (स.) यांचा बिछाना आहे. तुम्ही त्यावर बसावे हे मला आवडणार नाही."

अबू सुफियान म्हणाला, "अल्लाहशपथ, आमच्यातून वेगळी होऊन तू पार बदलून गेलीस."

नंतर तो पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे गेला व त्यांच्याशी बोलण्याची इच्छा प्रगट केली. मात्र त्यांनी उत्तर देण्याचे टाळले. नंतर तो माननीय अबू बकर

(रजि.) यांच्याकडे गेला व निवेदन केले, की त्यांनी त्याच्या वतीने पैगंबरांशी वार्तालाप करावा. त्यांनी विनंती फेटाळली. शेवटी तो मशिदीकडे गेला व घोषणा केली,

"लोक हो, मी हुदैबिया तहाचे नवीनीकरण केले आहे." असे बोलून तो उंटावर स्वार होऊन मक्का नगराकडे निघून गेला.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांना युध्दाची तयारी करण्याचे आदेश दिले, मात्र युध्दाचा कार्यक्रम जाहीर केला नाही. रमजानच्या १० तारखेस पैगंबरांनी दहा हजार सैनिक घेऊन मक्काकडे प्रस्थान केले व मक्का नगराच्या अलीकडे काही अंतरावर पडाव टाकला. मक्कावासीयांना काहीच माहिती नव्हती. नंतर पैगंबर जुहफा येथे पोहचले, तेव्हा त्यांच्या काकांनी (अब्बास (रजि.)) मुलाबाळांसह त्यांची भेंट घेतली. त्यांच्याशी चर्चा झाली. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपला पांढरा खच्चर त्यांना दिला व म्हटले की, "अबू सुफियानला घेऊन या." नंतर ते मर्रुज्जहरान येथे पोहचले. रात्री तेथे पडाव टाकण्यात आला. सर्वांना आदेश देण्यात आले की, प्रत्येकाने वेगवेगळ्या ठिकाणी शेकोट्या पेटवून उजेड करावा. अबू सुफियान व इतर शिपाई मक्काची पाहणी करण्याकरिता निघाले, तेव्हा त्यांना १०,००० शेकोट्या पेटलेल्या दिसल्या, ते घाबरून गेले.

अबू सुफियानला पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आणले गेले. माननीय अब्बास म्हणाले, "मी अबू सुफियान यांना सुरक्षितपणे येथे घेऊन आलो आहे."

इस्लामच्या तत्त्वांनी प्रभावित होऊन अबू सुफियान याने दुसऱ्या दिवशी सकाळी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या समक्ष इस्लाम धर्माचा स्वीकार केला.

मक्का आता डोळ्यांसमोर होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सेनेला कितीतरी भागांत विभागून टाकले. प्रत्येक भागाकरिता एक सेनापति नियुक्त केला. सर्वांना आदेश देण्यात आले की, "प्रत्येकाने वेगवेगळ्या मार्गाने शहरात प्रवेश करावा. जोवर कोणी हल्ला करीत नाही शस्त्र उगारू नका."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पाहिले की, माननीय अबू सुफियान हे मान खाली वाकवून जमिनीकडे पाहत आहेत. चेहरा उदास झाला आहे. पैगंबर म्हणाले, "अबू हंजला (अबू सुफियान)! काय झाले, आमच्याबरोबर सल्लामसलतीत भाग का घेत नाही?"

अबू सुफियान म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर! आता कुरैशवर आपले वर्चस्व आहे. तुमच्या सेनेत काही लोक असे आहेत ज्यांच्यात बदल्याची भावना धगधगत आहे. आपणास विनंती आहे की, सहानुभूतीची वागणूक देण्यात यावी.

दुश्मनांना चेष्टा करण्याची संधी देऊ नका.''

प्रिय पैगंबरांनी म्हटले, ''नाही, नाही तुम्ही निश्चिंत राहा. मक्कामध्ये मुस्लिमांचे भाऊबंद आहेत. मुहाजिरांचे वडील व काका वगैरे आहेत. येथे प्रतिष्ठित काबागृह आहे. अबू सुफियान आपल्या कुटुंबीयांकडे जा व त्यांना सांगा की, मुहम्मद मक्का शहरात एका चांगल्या भावासारखा प्रवेश करील. आज कोणीही विजेता नाही व पराजितही नाही. कोणी वर्चस्व गाजविणारही नाही व कोणी खजीलही होणार नाही. आज प्रेम व एकतेचा दिवस आहे. आज तर सर्वांना निश्चिंतता, शांती व मनस्वी आनंद प्राप्त झाला आहे. अबू सुफियानच्या घरात शिरणाऱ्याला (आश्रय) मिळेल. जो आपल्या घराचा दरवाजा बंद ठेवेल, त्यालाही सुरक्षा दिली जाईल. जो काबामध्ये प्रवेश करील त्यालाही सुरक्षा दिली जाईल.''

अबू सुफियानने मक्कावासीयांना ही वार्ता दिली, तेव्हा ते फार खूश झाले. विरोधकांनी हत्यार खाली टाकले. घरांचे दरवाजे बंद केले व खिडक्या आणि छतावरून दृष्य पाहू लागले. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जेव्हा दिनांक २० रमजान रोजी मक्कामध्ये विजेता म्हणून प्रवेश केला, तेव्हा घोषणाबाजी झाली नाही. कोणतेच नृत्य व गाजावाजा झाला नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी नम्रपणे डोके खाली वाकवून उंटावर बसून शहरात प्रवेश केला. अल्लाहचे उपकार जाणून कृतज्ञता प्रगट करीत होते. गर्व व घमेंडीचे चिन्ह नाममात्रही दिसत नव्हते. विजय दिवसाच्याप्रसंगी एक व्यक्ती पैगंबरांशी बोलताना थरथरू लागली तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''भिऊ नकोस, मी कोणी बादशाह नाही. मी कुरैश वंशाच्या एका महिलेचा मुलगा आहे.''

प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांचा ध्वज जैहून नावाच्या स्थानावर रोवण्यात आला व तेथेच विश्राम करण्याची सोय करण्यात आली. ते त्या ऐतिहासिक स्थानाच्या जवळ पोहचले ज्या ठिकाणी त्यांच्या नजरबंदीचा काळ गेला होता. नंतर मस्जिद-ए-हराम (काबा) येथे गेले. इस्लामपूर्व मक्का येथील गल्लीबोळात दलितासारखे जीवन व्यतीत केलेल्या माननीय बिलाल (रजि.) यांनी काबागृहावरून अजान दिली. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी काबाची प्रदक्षिणा (तवाफ) केली. त्या वेळी काबागृहात ३६० मूर्ती होत्या. पैगंबरांच्या हातात धनुष्य होते. ते धनुष्य मूर्तीच्या नाकावर ठेवत व म्हणत, ''सत्याचे आगमन झाले आहे व असत्य नष्ट झाले आहे. असत्य तर नष्ट होणारच होते.'' अल्लाहच्या पैगंबराने काबागृहातून (अल्लाहच्या घरातून) सर्व मूर्ती बाहेर काढल्या व काबागृहास पवित्र करून तिथे नमाज अदा केली.

# सार्वत्रिक क्षमादानाची घोषणा

पैगंबर मुहम्मद (स.) काबागृहातून बाहेर आल्यानंतर त्यांनी पाहिले की, कुरैश काबा परिसरात पंक्तीबध्द होऊन उभे आहेत. ते सर्व मुहम्मद (स.) यांच्या प्रतीक्षेत होते व स्वत:च्या भविष्याबाबत चिंतेने भयभीत होते. त्यांनी मुस्लिमांना खूप यातना दिल्या होत्या व अनेक प्रकारे छळले होते. त्यामुळे ते सर्व साशंक होते.

पैगंबर मुहम्मद (स.) त्यांना संबोधून बोलू लागले,

''अल्लाहअतिरिक्त दुसरा कोणी पूज्य नाही तो एकमेव आहे. त्याचा कोणी भागीदार नाही. त्याने आपल्या दासांची (मुस्लिमांची) मदत केली आहे व त्याने एकट्याने सर्व फौजाना पराजित केले आहे. ऐका! गर्व व घमेंडीच्या सर्व गोष्टी, रक्ताचे सर्व प्रकरण व आर्थिक मागण्या माझ्या पायाखाली आहेत (अर्थात त्या समाप्त झाल्या आहेत.) मात्र काबागृहाची देखरेख व हाजी लोकांना पाणी पुरविण्याचा वेगळा विचार केला जाईल.

हे कुरैश जनहो! आता अज्ञान, अभिमान व पूर्वजांचा गर्व अल्लाहने संपुष्टात आणला आहे. सर्व माणसे आदमची अपत्ये आहेत व आदमची निर्मिती मातीतून झाली होती.''

नंतर मुहम्मद (स.) यांनी कुरआनच्या ह्या आयतींचे वाचन केले.

''लोक हो, आम्ही तुमची उत्पत्ती एका पुरुष व एका स्त्रीपासून केली. तुमच्या वेगवेगळ्या जमाती व वंश निर्माण केले जेणेकरून तुम्ही एकमेकास ओळखावे. अल्लाहसमोर तुमच्यापैकी तो सर्वांत प्रतिष्ठित आहे जो सर्वांत अधिक सदाचारी आहे. नि:संदेह अल्लाह सर्वज्ञ आहे व सर्वांकडे लक्ष ठेवणारा आहे.''

*(दिव्य कुरआन, ४९:१३)*

नंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी घोषणा केली की, ''अल्लाह व त्याच्या पैगंबराने मद्य खरेदी-विक्री अवैध घोषित केली आहे.'' यानंतर त्यांनी (पैगंबर मुहम्मद (स.) यांनी) विचारले, ''कुरैशजनानो, माहीत आहे, मी तुमच्याशी कसा व्यवहार करणार आहे?'' सर्वजणांनी उच्चस्वरात म्हटले, ''चांगला व्यवहार, आपण एक चांगले बंधु आहात व चांगल्या बंधुचे पुत्र आहात.''

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''आज तुम्हाला कोणी पकडणार नाही. जा तुम्ही सर्व स्वतंत्र आहात.''

पैगंबर मुहम्मद (स.) साक्षात् प्रेम, दया व करूणा होते. अल्लाहने त्यांना 'रहमतुल्लिल आलमीन (संपूर्ण जगाकरिता दयानिधी) म्हणून पाठविले होते. हे सत्य आहे की, जगात अशी एकही व्यक्ती झाली नाही की, ज्याने एक-दोन नाही सर्वच्या सर्व शत्रू व विरोधकांना सरसकट आम माफी दिली असेल व मानवतेचा इतका महान आदर्श मांडला असेल.

# अंतिम हजप्रसंगी दिलेले ऐतिहासिक भाषण

मक्का व हुनैनच्या विजयानंतर पैगंबर मुहम्मद (स.) मदीना येथे परत आले. तेथे विविध ठिकाणांहून आलेल्या प्रतिनिधी मंडळाने त्यांची भेट घेतली. त्यापैकी बहुतेकांनी इस्लाम स्वीकारला. काहींनी मात्र शत्रुत्व व्यक्त केले. काहींनी पैगंबरत्वाचे ढोगसुद्धा केले. मुहम्मद (स.) अल्लाहवर विश्वास करून धैर्य व शिताफीने त्यांच्याशी सामना देत असत.

हिजरी सनाच्या दहाव्या वर्षी हज करण्याच्या इराद्याने ते मक्काकडे रवाना झाले. त्यांच्यासोबत एक लाखाहून जास्त लोक होते. या हज यात्रेस 'हज्ज्तुल विदाअ', 'हज्ज्तुलबलाग' व 'हज्ज्तुलतमाम' असे म्हटले जाते. या हजनंतर त्यांना पुन्हा मक्का, अरफात व काबाचे दर्शन घेण्याची संधी मिळाली नाही. हजच्या प्रसंगी त्यांनी ऐतिहासिक भाषण दिले त्यात मानवतेच्या कल्याण व सफलतेचा संदेश आहे. दुसऱ्या शब्दांत तो इस्लामी आचारविचारांचा जाहिरनामाच आहे. याप्रसंगी त्यांनी दोन भाषणे दिली. त्यांचा महत्त्वपूर्ण अंश खाली दिला आहे.

त्यांनी सुरूवातीला भाषणांत म्हटले,

''प्रिय बंधुनो! मी जे काही सांगत आहे, लक्षपूर्वक ऐका कदाचित या वर्षानंतर तुमची माझी भेट येथे होणार नाही.''

''हे मानवांनो, तुमचा ईश्वर (अल्लाह) एक आहे व तुमचा पिताही एकच आहे.''

''अल्लाहची ग्रंथ (कुरआन) व त्याच्या रसूल (पैगंबरा) चे उपदेश आचरणासाठी भक्कमपणे धरून ठेवा. लोकांचे प्राण, वित्त व अब्रूची योग्य सुरक्षा करा.

कोणत्याही अनामत रकमेचा अपहार करू नका. रक्तपात व व्याज-बट्ट्याच्या व्यवहारापासून अलिप्त राहा.''

त्यांनी म्हटले, ''कोणत्याही अरबास कोणत्याही अरबेतरावर वर्चस्व (वा प्राथमिकता) प्राप्त नाही, तसेच कोणत्याही अरबेतराला अरबावर, गोऱ्याला

काळ्यावर व काळ्याला गोऱ्यावर वर्चस्व प्राप्त नसेल. गौरव (व प्रतिष्ठा) केवळ सदाचाराच्या व संयमाच्या आधारावर प्राप्त होईल अर्थात् वर्ण, जाती, वंश, देश व क्षेत्राच्या आधारावर श्रेष्ठत्व प्राप्त होणार नाही. मोठेपणा केवळ श्रध्दा व चारित्र्याच्या आधारावरच प्राप्त होईल.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या भाषणात समता व बरोबरीवर जास्त भर दिला. उच्च-नीच, जाति-जमातीच्या शृंखलेचे त्यांनी तुकडे तुकडे करून टाकले. त्यांनी म्हटले,

"तुमच्या गुलामांना सहानुभूतीने वागवा जे तुम्ही खाता तेच त्यांना द्या जे तुम्ही परिधान करता तेच तुम्ही त्यांना द्या."

"अज्ञानाची सर्व तत्त्वे व नियम मी संपविले आहेत, अर्थात त्यांना समाप्त केले जात आहे."

"इस्लामच्या प्रसारापूर्वीच्या सर्व हत्या संपविल्या आहेत."

अर्थात, आता कोणालाही पूर्वी केलेल्या हत्यांचा बदला घेण्याचा हक्क नाही म्हणून सर्वांत प्रथम मी आपल्या घराण्यातील हत्येचे रबीआ इब्ने हारिस यांच्या हत्येचे प्रकरण संपवितो.

"अज्ञानकालातील सर्व व्याजाच्या रकमा रद्द करण्यात येत आहेत व मी सर्वांत प्रथम माझ्या घराण्यातील अब्बास इब्ने मुत्तलिब यांच्या व्याजाच्या रकमेला रद्द करतो."

"महिलांच्या बाबतीत अल्लाहचे भय बाळगा. तुमचा स्त्रियांवर व स्त्रियांचा तुमच्यावर अधिकार आहे."

"स्त्रियांच्या बाबतीत तुम्हाला ताकीद करतो की, तुम्ही त्यांच्याशी चांगुलपणाने वागा."

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मुस्लिमांना ताकीद केली,

"लोक हो, लक्षात असू द्या, माझ्यानंतर कोणताच पैगंबर येणार नाही व तुमच्यानंतर कोणताही (धार्मिक) समुदाय येणार नाही. म्हणून आपल्या

पालनकर्त्याची उपासना करा. रोज पाच वेळेची नमाज अदा करा, रमजान महिन्याचे रोजे पाळा, स्वखुशीने आपल्या जमा रकमांवर जकात (दान) द्या, आपल्या पालनकर्त्याच्या (काबा) घराचे हज करा. आपल्या शासकांच्या आज्ञांचे पालन करा. हे सर्व कराल तर आपल्या पालनकर्त्याकडून स्वर्गात प्रवेश मिळेल.

त्यांनी लोकांस उद्देशून विचारले,

''लोक हो, मी अल्लाहचा संदेश तुम्हाला दिला आहे काय?''

लोकांच्या त्या फार मोठ्या समूहाने एका आवाजात म्हटले, ''होय, हे अल्लाहच्या पैगंबरा.''

ही बाब पैगंबर मुहम्मद (स.) यांनी तीन वेळा उच्चारली.

''हे अल्लाह, तू साक्षी आहेस.''

जेव्हा त्यांचे प्रवचन संपले तेव्हा अल्लाहने खालील आयत (श्लोक) अवतरित केली,

''आज मी तुमच्याकरिता तुमचा दीन (जीवनपध्दत-धर्म) पूर्ण केला व माझी कृपा पूर्ण केली व तुमच्याकरिता इस्लामला दीन (जीवनमार्ग) म्हणून पसंत केले.'' *(दिव्य कुरआन, ५:३)*

या आयतीकडून स्पष्ट संकेत मिळतात की, पैगंबर मुहम्मद (स.) यांना ज्या उद्देशाकरिता जगात पाठविण्यात आले होते ते पूर्ण झाले होते व जे आदेश व मार्गदर्शन अल्लाहकडून मिळायचे होते ते लोकांस प्राप्त झाले होते.

# महाप्रयाण

'हज्जतुल विदाअ'च्या साधारण तीन महिन्यांनंतर अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) आजारी पडले. अंगात इतका ताप असे की त्यांना झोप येत नसे. ते अत्यंत अशक्त झाले. जोपर्यंत शरीरात शक्ती होती तोवर ते मशिदीत येऊन नमाज अदा करीत राहिले. सर्वांत शेवटची नमाज त्यांच्या नेतृत्वात ती होती मगरिबची (सूर्यास्त वेळची) नमाज. डोके दुखत होते. इशाची (रात्रीची) नमाजला ते मशिदीत येऊ शकले नाही. नंतर बऱ्याच दिवसांपर्यंत त्यांच्या आदेशानुसार माननीय अबू बकर (रजि.) नमाजचे नेतृत्व (इमामत) करीत राहिले. देहान्ताच्या पाच दिवस अगोदर त्यांना जरा बरे वाटले, तेव्हा त्यांनी शरीरावर सात मश्क (भांडे) पाणी ओतून घेतले. आंघोळ केल्याने त्यांना बरे वाटले म्हणून ते आधार घेऊन मशिदीत आले व सहकाऱ्यांना संबोधून म्हणाले,

"तुमच्या अगोदर असे लोक होऊन गेलेत की ज्यांनी आपल्या पैगंबर व सन्मानित पूर्वजांच्या थडग्यांना पूजास्थळाचे स्वरूप दिले होते. तुम्ही असे काही करू नका. माझ्या कब्र (थडग्याला) ला पूजास्थळाचे स्वरूप देऊ नका."

त्यांनी पुढे असे सांगितले -

"अल्लाहने आपल्या दासांना (भक्तांना) स्वायत्तता दिली आहे. त्यांनी ऐहिक वस्तुंची निवड करावी वा ते सर्व स्वीकारावे जे अल्लाहच्या दरबारात मिळणार आहे. दासाने (म्हणजे मी) अल्लाहच्या दरबारात जे मिळणार आहे त्याची निवड केली आहे."

माननीय अबू बकर (रजि.) यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या बोलण्याचा इशारा लक्षात आला. ते धायधाय रडू लागले. त्या वेळी संपूर्ण अरबस्थान मुहम्मद (स.) यांच्या अधीन होता. मात्र ते अत्यंत साधे जीवन व्यतीत करीत होते. त्यांच्याकडे संपत्ती स्वरूपात केवळ सात दीनार होते, तेही त्यांनी दान करून टाकले होते. एक पांढऱ्या रंगाचा खच्चर होता. एक जमिनीचा तुकडा होता व तोही त्यांनी दान करून टाकला होता. घरात दिवा पेटविण्याकरिता तेल नव्हते, म्हणून त्यांची

पत्नी माननीय आएशा (रजि.) यांनी थोडेसे तेल शेजारणीकडून उधार आणले होते. माननीय आएशा (रजि.) म्हणतात की, ''अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचा ज्या वेळी देहान्त झाला त्या वेळी कोणत्याच प्रकारचे खाद्य पदार्थ घरात नव्हते. कपाटात थोडासा जौ ठेवलेला होता. ते बरेच दिवस खात होते. एक दिवस त्यांचे मी वजन केले. बस, त्याच दिवसानंतर ते कमी होत गेले व शेवटी संपले.

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या देहान्तापूर्वी त्यांचे कवच (जिरह) एका ज्यूकडे गहाण ठेवून तीन साअ (अरबी माप) जौ आणले होते. त्यांच्याकडे अशी कोणतीच वस्तू नव्हती की जी विकून कवच परत आणता आले असते.

त्यांचा आजार कधी वाढत जाई कधी कमी होत असे. ज्या दिवशी त्यांचे देहावसान झाले त्या दिवशी सकाळी ते बेचैन नव्हते. मात्र दुपार होता होता त्यांची शुध्दी हरपली व सोमवार दिनांक १२ रबिउल अव्वल सन हिजरी ११ रोजी दुपारी त्यांचा देहान्त झाला. त्या दिवशी त्यांचे वय ६३ वर्ष ४ दिवस होते. शेवटच्या उच्छवासापूर्वी त्यांच्या मुखकमलातून शब्द उमटत होते,

''त्या लोकांच्या सोबत ज्यांच्यावर अल्लाहने कृपा केली, अल्लाह महान रक्षक आहे.''

असे म्हणत म्हणत त्यांनी शेवटचा श्वास सोडला व जगाच्या अंतिम दिवसा (कयामत) पर्यंत काळाच्या पड्याआड झाले!

# पैगंबर मुहम्मद (स.) यांचे काही कल्याणकारी उपदेश

इस्लामच्या तत्त्वानुसार व्यक्ती, कुटुंब व समाजाने इतरांच्या हक्कांची पूर्तता करावयाला हवी. त्या हक्कांची दोन भागांत विभागणी करण्यात आली आहे. एक अल्लाहचे हक्क दूसरे मानवी व इतर सजीवांचे हक्क. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दोन्ही प्रकारच्या हक्कांची सांगड घालून दोहोंचा समन्वय साधला आहे. त्यांनी आपल्या साथीदारांना या समन्वयाचे शिक्षण दिले व व्यावहारिक स्तरावर त्यांचा अवलंब करण्याचे प्रशिक्षणही दिले आहे. मानवी हक्कांची पूर्तता केल्याने स्वर्ग प्राप्त होण्याची शुभवार्ता देण्यात आली व त्यांचे हनन करणाऱ्या व्यक्तीस मग ती व्यक्ती कितीही ईशभक्त असो, तिला नरकाच्या भीषण शिक्षेची भयावह सूचना देण्यात आली. मानवी हक्कांचा संबंध येतो तो मुस्लिमेतरांशी, स्त्रियांशी, अनाथांशी, संकटात सापडलेल्या प्रवाशांशी, शेजाऱ्यांशी, आजाऱ्यांशी, गरिबांशी, मातपितांच्या संततीशी, नातेवाईकांशी, शासक व शासितांशी, पती व पत्नीशी एवढेच नव्हे तर पशु-पक्षी, कीटक वगैरे यांचेही हक्क मानवाने पुरे करायला हवे. या संबंधात संक्षिप्त चर्चा करीत आहोत.

मानवी समानता :

पैगंबर मुहम्मद (स.) यांची महत्त्वपूर्ण शिकवण आहे माणसामाणसांमधील समानता. त्यांच्या शिकवणीनुसार मनुष्य विशिष्ट रंग, वंश, जाति व क्षेत्रात जन्मल्याने श्रेष्ठ होत नाही की निकृष्ट व निम्न दर्जाचा होत नाही. सर्व मानव मग ते कोणत्याही रंग, वंश देश व जमातीचे असोत एकमेकांचे भाऊ आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, "तुम्ही सर्व आदमची संतान आहात व आदमची निर्मिती मातीने करण्यात आली होती."

एका वेगळ्या प्रसंगी अधिक विस्ताराने त्यांनी सांगितले,

"हे लोकहो, लक्षात असू द्या की, तुमचा पालनकर्ता एक आहे, तुमचा पिता एक आहे, कोणत्याही अरबास अरबेतरावर श्रेष्ठत्व प्राप्त नाही की कोणत्याही अरबेतरांना अरबांवर, न गोऱ्यांना काळ्यावर न काळ्याला गोऱ्यावर श्रेष्ठत्व प्राप्त आहे. श्रेष्ठत्व केवळ सदाचार व संयमामुळे प्राप्त होते." (हदीस : मुसनद अहमद)

पैगंबर मुहम्मद (स.) हे समतेचे व्यावहारिक आदर्श होते. त्यांचा जन्म व पालनपोषण अरबस्थानच्या अशा समाजात झाला होता ज्यात जातीय श्रेष्ठतेचे प्रस्थ होते. परंतु त्यांच्या अनुपम व्यक्तिमत्त्वात त्या दृष्टिकोनाचा जरासुध्दा लवलेश दिसून येत

नाही. ते लहान-मोठे, धनी-दरिद्री सर्वांशी आदराने वागत. ते स्वत:लाही इतरांपेक्षा श्रेष्ठ मानत नसत. सर्वांशी मिळून मिसळून वागत असत. ते इतके साध्यासुध्या पध्दतीने राहत की, अपरिचित माणसाला त्यांना भेटण्यासाठी इतरांकडे विचारपूस करावी लागत असे की, पैगंबर मुहम्मद (स.) आपणापैकी कोण आहेत?

प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या सहकाऱ्यांबरोबर खांद्याला खांदा लावून काम करीत असत. मस्जिद-ए-नबवीच्या बांधकामात ते मजूरासारखे राबले. खंदक खणताना ते जातीने त्या कामात सामील झाले होते. एका युध्दात ते सैनिकांकरिता भोजन तयार करताना स्वत:ही सहभागी झाले होते. त्यांनी जंगलातून लाकडे वेचून स्वत: उचलून आणली होती. सहकाऱ्यांनी त्यांना काम न करण्याची विनंती केली असता ते म्हणाले,

"मी तुमच्यापेक्षा काही श्रेष्ठ नाही."

एकदा युध्दावर जाताना स्वारीसाठी जनावरे कमी होती, तेव्हा सहकारी आळीपाळीने घोड्यावर व उंटावर स्वारी करून प्रवास करीत होते. पैगंबर मुहम्मद (स.) देखील कधी उंटावर तर कधी पायी प्रवास करीत होते. त्यांच्या सहकाऱ्यांनी विनंती केली की, "आपण उंटावर स्वार रहा आम्ही पायी प्रवास करू." तेव्हा पैगंबर म्हणाले, "माझ्यापेक्षा तुम्ही जास्त पायी चालू शकत नाही व मलाही पुण्याईची लालसा आहे."

एकदा प्रतिष्ठित जमात मख्जूमची महिला चोरी करताना पकडली गेली. लोकांनी उसामा बिन जैद (रजि.) द्वारा शिफारस केली की, "त्या महिलेस सोडून देण्यात यावे."

पैगंबर मुहम्मद (स.) ने उत्तर दिले,

"उसामा, तुम्ही अल्लाहच्या शिक्षा नियमात फेरफार सुचवीत आहात?"

त्यांनी लोकांना संबोधिले की, "तुमच्या अगोदर तुमच्या पूर्वजांचे राष्ट्र (लोकसमुदाय) याच कारणामुळे उद्‌ध्वस्त झाले की त्यांच्यातल्या एखाद्या प्रतिष्ठित व्यक्तीने कायदा भंग व गुन्हा केल्यास त्याला कोणतीच शिक्षा केली जात नसे. मात्र सर्वसामान्य व्यक्तीने गुन्हा केल्यास त्यास दंडित करण्यात येत असे. अल्लाहची शपथ, मुहम्मदची कन्या-फातिमाने जर चोरी केली असती तर तिलाही शिक्षा भोगावी लागली असती."

गुलामगिरीचा अंत :

इस्लामने गुलामगिरीच्या अमानवी प्रथेचा अंत करून टाकला. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आंदोलन कार्याने गुलामांचे स्वातंत्र्य आणि त्यांच्याशी उत्तम वागणुकीला का अभिन्न अंग बनविले, त्यांनी सांगितले,

''ज्याला अल्लाहने तुमच्या अधीन केले आहे त्याला तेच भोजन द्या जे तुम्ही जेवता, तसेच वस्त्र परिधान करण्यास द्या जसे तुम्ही स्वतः परिधान करता. त्याला इतके काम देऊ नका जितके त्याला करता येणार नाही. जर कठीण काम द्यायचे असेल तर तुम्ही स्वतःही त्यांच्याबरोबर काम करून त्याला मदत करा.''

(हदीस : बुखारी)

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सहकाऱ्यांनी त्यांच्या आदेशांचे पालन करण्याची सुरूवात केल्यानंतर हे लक्षात येणे कठीण झाले की मालक कोण आहे व गुलाम कोण आहे. (बुखारी) अशा प्रकारे गुलामगिरीची प्रथा संपुष्टात आली. या सुधारणेत कोणत्याही शासकीय, राजकीय व अधिकारीवर्गाचे सहकार्य प्राप्त नव्हते. हा केवळ चमत्कार होता पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या महान व्यक्तिमत्त्वाचा !! पूर्वी अरब लोक काळ्या लोकांचा द्वेष करीत असत. त्याच अरबांनी एक निग्रो गुलाम माननीय बिलाल (रजि.) यांना मस्जिद-ए-नबवीचे मुअज्ज़न (अजान देणारे) म्हणून नियुक्त केले. त्यांना जगात प्रतिष्ठा प्राप्त झाली. कवि इकबाल यांच्या शब्दांत,

एक ही सफ़ में खड़े हो गए महमूदो अयाज़
न कोई बन्दा रहा और न कोई बन्दा नवाज़।
बन्दओ, साहिबो, मुहताजो, सभी एक हुए
तेरी सरकार में पहुँचे तो सभी एक हुए।

गुलामांच्या बाबतीत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या दयाभावाने त्यांचे सहकारी बरेच प्रभावित झाले. माननीय उस्मान (रजि.), बरेच धनवान व दानशूर होते. ते पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जावई व मुस्लिमांचे तिसरे खलीफा होत. एकदा त्यांनी त्वेषाने आपल्या गुलामाचे कान पिळले. क्षणार्धात त्यांना जाणीव झाली की त्यांनी गुलामाचे कान पिळायला नको होते. त्यांनी गुलामास म्हटले, ''तूही माझे कान पीळ.'' गुलामाने त्यांच्या कानावर नुसते हात ठेवले. ते म्हणाले, ''असे नाही तसेच जोरात पीळ, जसे मी पिळले होते. अल्लाह याबाबतीत विचारणा करील, त्यापेक्षा येथेच परतफेड झालेली बरी.''

स्त्रियांचा मानसन्मान :

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनापूर्वी स्त्रियांची फारच दुर्दशा होती. त्यांना कोणतेच अधिकार प्राप्त नव्हते. त्यांना वारसाहक्कात वंचित ठेवण्यात येत होते. बलात्कार व दुराचार सामान्य बाब होती. निर्लज्जपणा व अश्लीलता तिरस्कृत नव्हती. कोणीही कितीही विवाह करावे. पुरुषांना हव्या तेवढ्या बायका बाळगण्याची मुभा होती. शरमेची बाब म्हणजे, स्वत:च्या सावत्र आईशी लग्न करून तिला पत्नी करून घेतले जात होते. मुलींची हत्या केली जात असे. मुलींचा जन्म होताच तिला जीवंत गाडून टाकले जात होते. स्त्रियांचे लैंगिक शोषण केले जात होते. त्यांना केवळ भोगविलासाची वस्तू समजले जात होते.

मानवतेचे महान उपकारकर्ते पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पुरुषांच्या अमानवी व गलिच्छ मानसिकतेत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणले व स्त्रियांना समाजात आदराचे सुरक्षित स्थान मिळवून दिले. कुरआन स्पष्टोक्ती आहे -

''त्यांच्याशी चांगल्या प्रकारे जीवन व्यतीत करा. जर त्या तुम्हाला नापसंत असतील तर शक्य आहे की एखादी गोष्ट तुम्हाला पसंत नसेल परंतु अल्लाहने त्यांच्यातच बरेचसे भले ठेवले असेल .'' *(दिव्य कुरआन, ४:१९)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे की, अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले होते,

''मुस्लिमांमध्ये श्रध्देच्या दृष्टीने सर्वांत परिपूर्ण तोच आहे ज्याचे आचरण सर्वांत चांगले असेल व जो आपल्या स्त्रियांशी चांगल्या प्रकारे वागत असेल तोच सर्वांत चांगला गणला जाईल.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्त्री-पुरुषांना न्यायपूर्ण अधिकार दिले. दोघांना संपत्ती व मिळकतीत समान अधिकार प्रदान केले. दोहोंना आपापल्या मिळकतीची खरेदी-विक्री करण्याचा अधिकार देण्यात आला आहे. त्यांना हवे ते ठेवावे, विकावे, गहाण ठेवावे, भाड्याने द्यावे. सारांश, आपल्या गरजेनुसार त्याचा उपयोग करावा. या बाबतीत स्त्री-पुरुषांना समान हक्क प्राप्त आहेत. कुरआनात म्हटले आहे,

''पुरुषांसाठी त्या संपत्तीत वाटा आहे जी आई-वडील आणि जवळच्या नातेवाईकांनी मागे ठेवली असेल आणि स्त्रियांसाठीही त्या

संपत्तीत वाटा आहे जी आई-वडील आणि जवळच्या नातेवाईकांनी मागे ठेवली असेल, मग ती कमी असो अथवा जास्त, हा वाटा (अल्लाहकडून) ठरविलेला आहे.'' *(दिव्य कुरआन, ४:७)*

''पुरुषांकरिता त्यांच्या कामाचा मोबदला व स्त्रियांना त्यांच्या कामाचा मोबदला.'' *(दिव्य कुरआन, ४:३२)*

एका हदीसमध्यें पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उपदेश दिला आहे,

''जे तुम्ही सेवन करता तेच त्यांना द्या. जे तुम्ही परिधान करता तेच त्यांना परिधान करण्यास द्या. त्यांना मारहाण करू नका व वाईट बोलू नका.''

(हदीस : अबू दाऊद)

प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मुलींच्या पालनपोषणाची प्रेरणा दिली. त्यांची हत्या थांबविली. वर्तमानकाळात मुस्लिम समाज भ्रूणहत्येसारख्या दुष्कर्मापासून मुक्त आहे. हा इस्लाम धर्माच्या शिकवणीचा प्रभाव आहे. या उलट दुसऱ्या समाजात आजही अशा प्रकारच्या घटना मोठ्या प्रमाणात घडत असल्याचे आढळून येतात. आता तर गैरमुस्लिम सर्रास स्त्री-भ्रूणाची हत्या करतात.

''इस्लाम मुलांना मुलींपेक्षा अधिक महत्त्व देत नाही. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, ''एखाद्या माणसाकडे कन्येचा जन्म झाल्यास तिला त्याने जीवंत गाडू नये. तिची उपेक्षाही करू नये व आपल्या मुलाला तिच्यापेक्षा अधिक महत्त्व देऊ नये. अल्लाह त्याला स्वर्गामध्ये प्रवेश देईल.'' (हदीस : अबू दाऊद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मुलीच्या पालनपोषण, शिक्षण-प्रशिक्षण विवाह व समतेच्या व्यवहाराच्या मोबदल्यात नरकापासून मुक्ती व स्वर्गातमध्ये प्रवेशाची सुवार्ता दिली आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात,

''ज्याने तीन मुलींची जोपासना केली, त्यांना शिक्षण-प्रशिक्षण दिले, त्यांचे विवाह करून त्यांच्याशी सद्व्यवहार केला, त्यास स्वर्गात प्रवेश मिळेल.''

(हदीस : अबू दाऊद)

एका हदीसमध्ये म्हटले आहे, ''तुमच्यापैकी कोणाला तीन मुली वा तीन बहिणी असतील व तो त्यांच्याशी चांगली वागणूक ठेवत असेल तर त्याला निश्चितच स्वर्गात प्रवेश मिळेल.'' (हदीस : तिर्मिजी)

माननीय अबू हुरैरा (रजि.) म्हणतात की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उपदेश दिला आहे,

"ज्याला तीन मुली असतील व त्यास त्यांच्यामुळे निर्माण होण्याऱ्या अडीअडचणी व आर्थिक समस्यांना तो शांतपणे सहन करीत असेल तर त्याच्या सहानुभूतीपर वागणुकीने अल्लाह प्रसन्न होऊन त्याला स्वर्गात प्रवेश देईल."

यावर एका व्यक्तीने विचारले की, "एखाद्यास दोन मुली असतील व तो अडीअडचणींना तोंड देत असेल तर त्याचे काय?"

पैगंबर (स.) यांनी सांगितले "दोन मुली असल्या तरीही (अल्लाह स्वर्गात प्रवेश देईल.)" नंतर दुसऱ्या व्यक्तीने विचारले, "जर एकच मुलगी असेल तर?" पैगंबर (स.) म्हणाले, "एक असेल तरीही." (मुस्तदरक हाकिम)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विवाहाच्या वेळी मुलीच्या संमतीलाही महत्त्व मिळवून दिले.

पतीचा देहान्त झाल्यास किंवा तिला पतीने घटस्फोट दिल्यास व ती जर आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी नसेल तर तिच्या खर्चाची जबाबदारी संततीवर असेल व संतती नसल्यास महिलेचे पिता वा जवळच्या नातेवाईकांवर तिचा सांभाळ करण्याची जबाबदारी असेल.

माननीय सुराका बिन मालिक (रजि.) यांचे कथन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना विचारले,

"तुम्हाला माहीत आहे काय की, सर्वांत मोठा सदका (दान-पुण्य) कोणते आहे?"

त्यांनी उत्तर दिले, "हुजूर आपणच सांगा?"

पैगंबर म्हणाले, "तुमच्या त्या मुलीवर उपकार करणे जी (विधवा झाल्यानंतर व तलाक (घटस्फोट) झाल्यानंतर) तुमच्याकडे परतून येईल, कारण तुमच्याशिवाय तिला आधार देणारा कोणीच नाही." (हदीस : मुसनद अहमद)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विधवेशी विवाह करण्याचे समर्थन केले व त्यास पुण्य कार्य म्हटले आहे.

**प्राण्यांबद्दल दयादृष्टी :**

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मानवाबद्दल उदारता, क्षमाशीलता व दयाभाव दर्शविण्याचे शिक्षण दिले आहे. त्याचबरोबर पशू-पक्षी याबद्दलही दया बाळगण्याचा उपदेश दिला आहे.

''पैगंबर मुहम्मद (स.) यांना साऱ्या सजीवांकरिता दयानिधी म्हणून पाठविण्यात आले होते. ते स्वतः जितके शूरवीर होते तेवढेच दयाळूही होते. त्यांनी जनावरांवर दया करण्याचे, त्यांना पोटभर चारा-पाणी देण्याचे आदेश दिले व त्यांना त्रस्त करण्यापासून रोखले. इस्लामच्या प्रचार व प्रसारापूर्वी अरब लोक जनावरांना खुंटाला बांधून त्यांच्यावर नेमबाजीचा सराव करीत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या प्रकारे केला जाणारा जनावरांचा छळ सक्तीने बंद केला. एकदा त्यांनी एक घोडा पाहिला ज्याचा चेहरा जख्मी होता. ते म्हणाले, ज्याने याच्या चेहऱ्यावर जखमा केल्यात त्यावर अल्लाहची अवकृपा होवो!''(हदीस : तिर्मिजी)

''पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जनावरांच्या टक्करींच्या खेळास मनाईचा आदेश दिला होता. त्यांच्या दयाभावाचे एक उदाहरण असे आहे : एकदा प्रवासात असताना त्यांच्या सहकाऱ्यांनी एका पक्ष्याची दोन पिले पकडली. पक्षी आपल्या पिलांकरिता व्याकूळ झाल्याचे पैगंबरांनी पाहिले व विचारले की, या पक्ष्याला कोणी व्याकुळ केले आहे? सहकारी म्हणाले, ''आम्ही या पक्ष्यांची पिले पकडली आहेत.'' पैगंबरांनी पिले सोडून देण्याचे आदेश दिले.'' (हदीस : अबू दाऊद)

''अशीच आणखीन एक घटना घडली होती. यांच्याकडे एक इसम आला व म्हणाला की, एका झाडीत चिमण्यांची पिले होती ती मी काढून घेतली. आता पिलांची आई (चिमणी) माझ्या डोक्यावर घिरटे घालीत आहे. पैगंबरानी सांगितले, ''जा, जिथून ही पिले उचलली होती, तेथेच ठेवून दे.'' (हदीस : अबू दाऊद)

''एक उंट भुकेने व्याकुळ झाला होता. पैगंबरांना पाहून तो ओरडू लागला. त्या उंटाचा मालक अंसारी होता त्याला बोलावून पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''या जनावराच्या बाबतीत तुम्हाला अल्लाहचे भय वाटत नाही काय?''(हदीस : अबू दाऊद)

माननीय अनस (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जनावरांना बांधून मारण्याची मनाई केली होती. (हदीस : बुखारी, मुस्लिम)

जनावरांवर निर्दयपणे अत्याचार करण्याच्या अनेक घटनांचा उल्लेख इस्लामपूर्व काळात केला जातो. प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जनावरांशी होणाऱ्या अमानुष व्यवहारांचा निषेध केला होता.

एकेश्वरत्व :

१. माननीय मुगीरह इब्ने शेबा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) फर्ज नमाजनंतर खालील मजकूर वाचत असत.

''अल्लाहशिवाय कोणीही पूज्य नाही. त्याचा कोणीही सहभागी नाही. त्याचेच शासन आहे, सर्व प्रशंसा व स्तुती त्याच्याचकरिता आहे व त्याला सर्व प्रकारचे सामर्थ्य प्राप्त आहे.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. माननीय अनस (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले होते.

तुमचा पालनकर्ता अल्लाह म्हणतो, ''माझा हक्क आहे की, माझेच भय बाळगले जावे व माझ्याव्यतिरिक्त इतर कोणास आराध्य बनवू नये. म्हणून जी व्यक्ती दुसऱ्या कोणालाच आराध्य बनविण्यापासून अलिप्त राहिली व माझ्याशिवाय इतर कोणासही पूज्य मानले नाही, तिला मी क्षमादान करणे योग्य समजेन.''

(हदीस : अहमद, तिर्मिजी, नसई)

३. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की अल्लाह म्हणतो,

''ज्या कोणा व्यक्तीने कोणत्याही कर्मात (माझ्या व्यतिरिक्त) इतर कोणास सामील केले असेल तर त्यापासून मी दूर आहे व ते कर्म त्याच्याचकरिता आहे, ज्याच्याकरिता ते केले गेले आहे. माझा त्यांच्याशी कोणताच संबंध नाही.''

(हदीस : मुस्लिम)

एक अल्लाहावर श्रध्दा :

कुरआनमध्ये अल्लाहने स्पष्ट आदेश दिला आहे,

''अल्लाहच्याच आज्ञेने येऊ शकते आणि अल्लाहवरच ईमानधारकांनी विश्वास ठेवला पाहिजे.'' *(दिव्य कुरआन, १४:११)*

''हे पैगंबर (स.), त्या परमेश्वरावर विश्वास ठेवा जो जिवंत आहे.''

मा. इब्ने अब्बास (रजि.) यांनी सांगितले आहे, पैगंबर मुहम्मद (स.)

अशी प्रार्थना करीत असत,

"हे अल्लाह, मी तुझा आज्ञाधारक आहे, तुझा श्रध्दाळू आहे, तुझ्यावर विश्वास करतो, तुझ्याशी संबंध स्थापित केला आहे आणि तुझ्या आधारे (धर्मशत्रूंशी) मुकाबला केला आहे. हे अल्लाह मी तुझ्या महिमेचा आश्रय घेत आहे. तुझ्याशिवाय कोणी आराध्य नाही. तू अशी सशक्त सत्ता आहेस जिला अंत नाही, मात्र यक्ष व मानव मृत्यू पावणारे आहेत."

(हदीस : बुखारी,मुस्लिम)

एक अल्लाहकडून शुभलाभाची अपेक्षा (कृपाभिलाषा) :

१. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की अल्लाह म्हणतो,

"मी माझ्या दासाच्या (मनुष्याच्या) ध्यानात असतो व जेव्हा तो माझी आठवण करतो मी त्याच्या जवळ असतो. तो जर माझी मनातल्या मनात आठवण करतो तर मीही त्याची आठवण करतो. जर तो माझी जनसमूहात आठवण करतो तर मी त्याची आठवण अशा समूहात करतो जो त्या मनुष्यांच्या समूहापेक्षा चांगला व उच्च दर्जाचा असतो. जर मनुष्य माझ्याकडे एक बालिश्त (पंजाच्या अंतरा इतके) पुढे येतो तर मी एक हाताचे अंतर त्याच्या जवळ जातो व जेव्हा मनुष्य माझ्याकडे एका हाताच्या अंतराने जवळ येतो तर मी दोन हाताचे अंतर त्याच्याकडे येतो आणि जर मनुष्य माझ्याकडे चालून येत असेल तर मी त्याच्याकडे धावून जातो."

(हदीस : बुखारी, मुस्लिम, तिर्मिजी, नसई, इब्ने माजा)

२. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की अल्लाह म्हणतो,

"मी माझ्या दासाच्या (मनुष्याच्या) ध्यानात असतो व जेव्हा मला तो हाक देतो मी त्याच्या जवळ असतो." (हदीस : तिर्मिजी)

अल्लाहचे स्मरण करणे :

१. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) म्हणत असत की अल्लाह सांगतो,

"हे आदमच्या लेकरा! तू जर माझा नामोल्लेख केला तर तू माझे आभार व्यक्त केलेस. जर तुला माझा विसर पडला असेल तर तू कृतघ्न झालास."

(तबरानी)

२. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की अल्लाह म्हणतो,

"हे आदमच्या पुत्रा, तू माझ्या उपासनेसाठी वेळ देत जा, मी तुझ्या हृदयाला समृध्द करीन. तुला कसलीच कमतरता भासू देणार नाही. नाहीतर तुला सतत कामात गुंतवून ठेवीन व तुला कमतरतेच्या आहारी जावे लागेल."

(हदीस : तिर्मिजी, बैहकी)

अल्लाहचे कृपादान :

१. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले होते की, जेव्हा अल्लाहने मानवाच्या निर्मितीचा निर्णय घेतला तेव्हा एक पुस्तक लिहिले जे अल्लाहजवळ आहे. त्याच्यात लिहिले आहे, 'निश्चितच माझी कृपा माझ्या प्रकोपापेक्षा जास्त आहे.'

एका हदीसमध्ये पुढील शब्द आहेत,

"माझी कृपा माझ्या अवकृपेपेक्षा जास्त आहे."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. माननीय अनस (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा एखादा दास (मनुष्य) (क्षमायाचनेकरिता) म्हणतो की, हे माझ्या पालनकर्त्या! जरी तो दुष्कर्मी असला व दूत (फरिश्ते) म्हणत असले की, हे पालनकर्त्या हा कृपापात्र नाही, तरी अल्लाह म्हणतो की, मी त्याला क्षमादान करावे यातच माझी महानता आहे." (हदीस : तिर्मिजी)

ईशप्रेम :

१. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, जगाच्या अंताच्या दिवशी अल्लाहला म्हणेल,

"कुठे आहेत ते लोक जे माझ्या सामर्थ्य व प्रतिष्ठेमुळे आपसात एक दूसऱ्यावर प्रेम करीत होते? आज मी त्यांना आपल्या छत्रछायेत ठेवीन. आज माझ्या छायेव्यतिरिक्त कोठेच कोणतीच छाया नाही." (हदीस : मुस्लिम, बुखारी, मालिक)

सत्यमार्गावर दृढ राहाणे :

"माननीय अबू अम्र यांचे निवेदन आहे व सुफियान बिन अब्दुल्लाह (रजि.) म्हणतात की मी म्हटले,

"हे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) मला इस्लामची एखादी अशी गोष्ट

सांगा की, त्याविषयी इतर कोणाकडून काहीही विचारण्याची गरज राहणार नाही. पैगंबर म्हणाले, ''बोला की, माझी अल्लाहवर श्रध्दा आहे व त्यावर कायम राहा.''

(हदीस : मुस्लिम)

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी प्रेम :

१. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

''तुमच्यापैकी कोणतीही व्यक्ती तोवर मुस्लिम (श्रध्दावान) होणार नाही जोवर तिला तिच्या संतती, तिचे पिता व जगातील सर्व माणसांपेक्षा अधिक मी प्रिय वाटणार नाही.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''मला सीमेपलीकडे सन्मान देऊ नका जसा ख्रिस्ती लोकांनी इसा (अ.) यांना दिला आहे. मी तर अल्लाहचा सेवक आहे. म्हणून मला अल्लाहचा सेवक व त्याचा पैगंबर माना.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वत:बाबत असेही म्हटले आहे, ''मी काही आगळावेगळा पैगंबर नाही. माझ्यापूर्वी जगात कितीतरी पैगंबर मार्गदर्शनासाठी येऊन गेलेत. आपल्या धर्मग्रंथात पाहून घ्या किंवा कोणातरी ज्ञानी व्यक्तीला विचारून घ्या. मी पूर्वीच्या पैगंबरांच्या शिकवणीला पुनर्जीवित करण्यासाठी व दिशाभूल करणाऱ्यांपासून मानवाना मुक्त करण्यासाठी आलो आहे. मला पाठविण्याचे कारण की, मी मानवाला नैतिकता व सदाचाराच्या सर्वोच्च शिखरापर्यंत पोहचवावे.''

इस्लामची मूलभूत तत्त्वे :

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''इस्लामची पाच मूलभूत तत्त्वे आहेत. अशी साक्ष देणे की, अल्लाहशिवाय दुसरा कोणी आराध्य नाही व मुहम्मद (स.) त्याचे दास व पैगंबर आहेत. नियमितपणे नमाज अदा करणे, जकात (दान) देणे, रमजानचे रोजे पाळणे व हजकरिता मक्का येथे जाणे.'' (हदीस : मुस्लिम, बुखारी)

अल्लाहच्या मार्गात खर्च करणे :

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, अल्लाहचे पैगंबर

मुहम्मद (स.) यांनी सांगितले की अल्लाह म्हणतो,

''हे आदमपुत्रा! (तू अल्लाहच्या मार्गावर आपली धनसंपत्ती) खर्च कर, मी तुझ्यासाठी खर्च करीन.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

**जनसेवा**

१. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की, अल्लाह जगाच्या अंतानंतरच्या दिवशी एखाद्या माणसाला विचारेल,

''हे आदमपुत्रा! मी आजारी झालो, तू माझ्या तब्बेतीची विचारपूस केली नाही. तो माणूस उत्तर देईल, ''हे पालनकर्त्या, मी तुझ्या तब्यतेची विचारपूस कशी करू शकलो असतो? तू तर संपूर्ण जगाचा पालनकर्ता आहेस!'' अल्लाह म्हणेल, ''तुला माहीत नव्हते काय की. अमुक माणूस (माझा दास) आजारी होता. तू त्याच्या आजारपणात त्याची विचारपूस केली होती काय? तू जर त्याची विचारपूस केली असती तर मी त्याच्या जवळच आढळून आलो असतो! मी तुझ्याजवळ जेवायला मागितले, तू मला भोजन दिले नाही?'' माणूस म्हणेल, ''हे पालनकर्त्या, मी तुला जेवायला कसे दिले असते, तू तर साऱ्या जगाचा पालनकर्ता आहेस.'' अल्लाह म्हणेल, ''तुला माहीत नाही काय की माझ्या अमुक दासा (माणसा) ने भोजन मागितले होते, परंतु त्याला तू भोजन दिले नाहीस. तुझ्या लक्षात आले नाही की, तू जर त्याला जेवण दिले असते तर त्याला (पुण्याईला) माझ्याजवळ पाहिले असते. हे आदमपुत्रा! मी तुझ्याकडे पाणी मागितले, मात्र मला तू पाणी पाजले नाही.'' माणूस म्हणेल, ''हे पालनकर्त्या, मी तुला पाणी कसे पाजले असते, तू तर साऱ्या जगाचा पालनकर्ता आहेस.'' अल्लाह म्हणेल, ''माझ्या अमुक दासा (माणसा) ने तुझ्याकडे पाणी मागितले होते पण तू त्याला पाणी पाजले नाहीस. तू जर त्याला पाणी पाजले असते तर त्याला (पुण्याईस) माझ्याजवळ पाहिले असते.'' (हदीस : मुस्लिम)

२. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की अल्लाह म्हणतो,

''तीन लोक असे आहेत की, ज्यांच्याशी मी भांडण करीन. एक ती व्यक्ती जिने माझी शपथ घेऊन वचन दिले व नंतर वचनभंग केला, दुसरी व्यक्ती जिने एखाद्या स्वतंत्र व्यक्तीस विकून तिची किंमत खाऊन टाकली. तिसरी व्यक्ती

ती जिने मजुराला कामावर लावले, काम करून घेतले व नंतर तिला मजुरी दिली नाही.''  (हदीस : बुखारी, इब्ने माजा, अहमद)

विधवा व गरिबांना मदत :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की, विधवा व गरिबांना मदत करणारा, अल्लाहच्या मार्गावर (जिहाद व अल्लाहच्या दीन (धर्मा) चा प्रसार करून त्यास स्थापित करण्यासाठी) कष्ट करणाऱ्यासमान आहे.

असे समजते की पैगंबर मुहम्मद (स.) म्हणत असत की, ''त्या व्यक्तीचे स्थान असे आहे जसे एखादी व्यक्ती अल्लाहच्या आराधनेत आळस न करता जागरण करते व रोजापालन करण्यातही हयगय करीत नाही.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

लोकांशी सदाचाराचे वर्तन :

कुरआनात म्हटले आहे,

''तुम्ही सर्वजण अल्लाहची भक्ती करा, त्याच्यासमवेत कोणाला भागीदार बनवू नका, आईवडिलांशी नेक वर्तणूक ठेवा, नातेवाईक आणि अनाथ व गोरगरीबांशी चांगला व्यवहार करा.''

अनाथांची सेवा :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''जो मनुष्य आपल्या व इतरांच्या अनाथांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करील तो आणि मी स्वर्गात असे (इतक्याजवळ) राहू जसे अंगठा व लगतच्या दोन बोटांत जवळीक असते.''  (हदीस : बुखारी)

आईवडिलांची सेवा :

कुरआनात म्हटले आहे,

''व आम्ही लोकांना आपल्या आईवडिलांशी चांगल्या प्रकारे वागण्याचे उपदेश दिले आहेत.''

१) माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे,

एक व्यक्ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आली व म्हणली, ''हे अल्लाहचे पैगंबरा! अशी कोणती व्यक्ती आहे जिला माझ्याकडून चांगल्या व्यवहाराचा व सहकार्याचा सर्वांत अधिक अधिकार आहे?''

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''तुझी आई.''

त्यांनी विचारले, ''तिच्यानंतर?'' पैगंबर (स.) म्हणाले, ''तुझी आई.''

त्यांनी विचारले, ''तिच्यानंतर?'' पैगंबर (स.) म्हणाले, ''तुझी आई.''

त्यांनी पुन्हा विचारले, ''तिच्यानंतर?''

पैगंबर (स.) म्हणाले, ''तुझे पिता.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

''धूळ-माती जाओ त्याच्या नाकात.'' पुन्हा म्हटले, ''धूळ-माती जाओ त्याच्या नाकात.'' (अर्थात त्याचा अपमान होओ) ज्याने आपल्या आईवडिलांच्या वार्धक्यकाळात, एकाची व दोघांची (सेवा करून) स्वर्गात प्रवेश मिळविला नाही.'' (हदीस : मुस्लिम)

३. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''सर्वांत जास्त पुण्याईचे कार्य हे आहे की मनुष्याने आपल्या वडिलांच्या (मृत्यु) नंतर वडिलांच्या मित्रांचे हक्क अदा करावेत.'' (हदीस : मुस्लिम)

**नातेवाईकांशी सद्‌वर्तन :**

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

''तुमच्यात सर्वांत चांगला माणूस तो आहे जो घरातील लोकांशी चांगल्या प्रकारे वागतो.'' व ते म्हणाले, ''मी माझ्या घरातील लोकांशी तुम्हा सर्वांपेक्षा अधिक चांगले वर्तन करतो.'' (हदीस : तिर्मिजी, दारमी, इब्ने माजा)

**पतिव्रता पत्नी :**

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''जगातल्या सर्व वस्तू अल्पावधीत नष्ट होणार आहेत व त्यात सर्वाधिक चांगली वस्तू आहे पतिव्रता पत्नी.''

शेजाऱ्यांशी सद्व्यवहार :

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"अल्लाहची शपथ तो मुस्लिम (मोमिन) नाही, अल्लाहची शपथ तो मुस्लिम नाही, अल्लाह शपथ तो मुस्लिम नाही." लोकांनी विचारले, "कोण मुस्लिम नाहीं?" प्रिय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले "तो, ज्याचा शेजारी त्याच्या दुर्व्यव्हरापासून सुरक्षित राहत नसेल." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

दया :

१. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"अल्लाह त्या माणसावर दया करीत नाही जो लोकांवर दया करीत नाही." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"दया करणाऱ्यांवर दयावान (अल्लाह) दया करेल. जमिनीवर राहणाऱ्यांवर दया करा, आकाशातून तो तुमच्यावर दया करील."

(हदीस : अबू दाऊद, तिर्मिजी)

दुष्कर्म :

१. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"मोठे पाप हे आहे की अल्लाहचा कोणी भागीदार आहे असे मानणे, आईवडिलांच्या आज्ञांचे पालन न करणे, सजीवांची कत्तल करणे व खोटी साक्ष देणे." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

२. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात,

"सात घातक व विनाशक दुष्कर्मांपासून अलिप्त राहा." त्यांच्या सहकाऱ्यांनी विचारले, "ते कोणते दुष्कर्म?" पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, "अल्लाहचा भागीदार मानणे, जादू करणे, विनाकारण हत्या करणे, व्याज आकारणे/स्वीकारणे, अनाथांचा माल हडप करणे, जिहादच्या वेळी मैदानावरून पळ काढणे व पवित्र, श्रध्दाळू, साध्याभोळ्या महिलांवर व्यभिचाराचे दोषारोपण करणे."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

लाज (लज्जा बाळगणे) हिजरी :

१. माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांचे निवेदन आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे की अल्लाह म्हणतो,

''विषयासक्त नजर ही सैतानाच्या विषारी बाणांपैकी एक बाण असून ज्याने तिचा माझ्या भयाने त्याग केला (अर्थात परस्त्रीवर वाईट दृष्टी टाकण्याचे टाळले) तर मी त्याच्या श्रध्देत रुचि व गोडवा त्याच्या मनात निर्माण करीन.''

(तबरानी)

२. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात,

''लज्जा परिपूर्ण पुण्य आहे.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

मद्य व जुगाराचा निषेध :

कुरआनात म्हटले आहे,

''हे श्रद्धावंतांनो, ही दारू आणि जुगार व वेदी आणि शकून ही सर्व अमंगल सैतानी कामे होत, यांच्यापासून दूर राहा, आशा आहे की तुम्हाला यश मिळेल.''

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांची शिकवण इतकी प्रभावकारी होती की, अरब लोक जे मद्य व जुगारामध्ये रात्रंदिवस मग्न राहायचे ते त्या शापित सवयीपासून पूर्णतः मुक्त झाले. नशाबंदीचा आदेश मिळताच मद्याची मडकी फोडून टाकण्यात आली. मदीनेच्या गल्लीबोळांत मद्याचे पाट वाहू लागले. एका ठिकाणी मद्यपी लोकांची महफिल रंगली होती. दहा-बारा जण नशेत धुंद झाले होते. इतक्यात पैगंबरांची घोषणा ऐकू आली की, दारू निषिध्द करण्यात आली आहे. नशेत असूनही अल्लाहच्या आदेशाचे तुरंत पालन करण्यात आले. मद्यप्राशन थांबविण्यात आले व मद्याची मडकी फोडण्यात आली.

वर्तमानकाळात जुगार व मद्याचे आकर्षण वाढल्यामुळे अनेक समस्या निर्माण झाल्या आहेत. त्यांना संपुष्टात आणण्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीचा अवलंब करायला हवा. त्यांनी ज्या वस्तूंच्या सेवनाने बुद्धी मंद पडते (अर्थात मनुष्य नशेत धुंद होतो) त्या सर्व निषिध्द केल्या आहेत.

निंदानालस्ती करू नये :

कुरआनात म्हटलंय,

''तुमच्यापैकी कुणीही कुणाची चहाडी करू नये. काय तुमच्यापैकी

एखादा असा आहे की जो आपल्या मृत भावाचे मांस खाणे पसंत करील? पाहा, तुम्हा स्वत:ला याची घृणा वाटेल अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा, अल्लाह मोठा पश्चात्ताप स्वीकारणारा आणि परम कृपाळू आहे.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटलंय,

''निंदानालस्ती करणाऱ्यास स्वर्गातमध्ये प्रवेश मिळणार नाही.''
(हदीस : बुखारी, मुस्लिम)

अत्याचार व स्वार्थाचा त्याग :

''अत्याचारापासून अलिप्त राहा, कारण अत्याचार जगाच्या अंतिम दिवशी अंधाराचे रूप धारण करील. स्वार्थाचा त्याग करा, कारण तुमच्या पूर्वजांचा स्वार्थामुळेच सर्वनाश झाला होता. लालसेपोटी त्यांनी लोकांचे रक्त सांडले व त्यांनी अल्लाहने निषिध्द केलेल्या वस्तूंना वैध केले होते.'' (हदीस : मुस्लिम)

रागावर काबू ठेवावा :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हटले आहे,

''दुसऱ्यांना आपटणारा शक्तिमान नसतो. शक्तिमान तर तो मानला जाईल जो रागावर काबू करू शकतो.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

जिभेवर व गुप्तांगावर नियंत्रण :

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) म्हणालेत,

''जी व्यक्ती आपल्या दोन जबड्यांच्या व दोन पायांच्या मध्यभागी असलेल्या (जीभ व गुप्तांग) या दोन अवयवांवर नियंत्रण ठेवू शकते त्या व्यक्तीला मी स्वर्गप्राप्तीची खात्री देतो.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

ईर्षा बाळगू नये :

''माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले होते की, हेवादावा बाळगू नका, कारण ईर्षेमुळे मनुष्यातले सर्व सद्‌गुण संपुष्टात येतात, जसे आग लाकडाला जाळून खाक करते तसेच ईर्षा सद्‌गुणांना

संपुष्टात आणते.''                                                      (हदीस : अबू दाऊद)

सुस्वभावी व्हावे :

१. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

''ज्याच्या स्वभावात मृदुता नाही त्याला चांगुलपणा प्राप्त होऊ शकत नाही.''                                                                     (हदीस : बुखारी)

२. माननीय जाबिर (रजि.) यांचे निवेदन आहे की, अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

''अल्लाह त्या व्यक्तीवर दया करो जी क्रयविक्रय करताना व परतफेडीची मागणी करताना मृदु भाषेचा वापर करते.''                                    (हदीस : बुखारी)

भाग २

# पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी मुस्लिमेतर मान्यवरांचे विचार

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन व शिकवणीने संपूर्ण जगात कल्याणकारी क्रांती निर्माण केली. ज्या विद्वान मान्यवरांनी निष्पक्षपणे त्यांच्या जीवन व शिकवणीचे अध्ययन केले आहे, ते त्यांची महानता स्वीकारल्याशिवाय राहत नाहीत.

पैगंबर मुहम्मद (स.) व इस्लाम धर्माबाबतचे काही विद्वानांचे विचार पुढे दिले आहेत.

## स्नेह व सहिष्णुतेचे प्रचारक

स्वामी विवेकानंद म्हणतात,

''पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जगास समानतेचा संदेश दिला आहे. त्यांनी मानवजातीमध्ये स्नेह व सहिष्णुतेचा प्रचार केला आहे. धर्मात जात, जमात, वंश व गटबाजीला स्थान नसावे असा त्यांचा संदेश आहे.''

स्वामी विवेकानंद इस्लाम धर्माचे मोठे प्रशंसक होते व इस्लामच्या बंधुभावाच्या तत्त्वाने ते अतिशय प्रभावित झाले होते. 'वेदान्ती मस्तिष्क व इस्लामी शरीर' हाच भारतीय समाजाच्या मुक्तीचा मार्ग आहे असे ते मानत असत. दिनांक १० जून १८९८ रोजी त्यांनी त्यांचे नैनीतालनिवासी मित्र मुहम्मद सरफराज हुसैन यांना पत्रात लिहिले होते, ''हे अनुभवाने सिध्द झाले आहे की, व्यावहारिक जीवनाच्या स्तरावर जर कोणत्या धर्माने समानतेचे तत्त्व कौतुकास्पदरीत्या अमलात आणले असेल तर ते केवळ इस्लामनेच. इस्लाम समस्त मानवजातीला समानतेने पाहतो व समानतेने वागवितो. यालाच अद्वैत (एकत्व) म्हणतात. म्हणूनच आमचा विश्वास आहे की, व्यावहारिक इस्लामच्या सहायतेविना, अद्वैताचा सिध्दान्त मग तो कितीही उत्तम व चमत्कारपूर्ण असो, विशाल मानवसमाजाकरिता निरूपयोगी ठरेल!''

- विवेकानंद साहित्य, खंड ५, पृ. ४१५

स्वामी विवेकानंद यांनी स्पष्ट शब्दात म्हटले आहे की, ''भारतात इस्लाम

धर्माचा प्रसार तलवार (बल प्रयोग), फसवेगिरी व भौतिक प्रलोभनाद्वारे झालेला नाही.''

- विवेकानंद साहित्य, खंड ८ पृ.३३०

इ. स. १९३७ साली मद्रास (चेन्नई) येथे प्रकाशित झालेले, सी.एस.श्रीनिवास यांच्या 'हिस्ट्री ऑफ इंडिया'मध्ये उल्लेख आहे,

''इस्लामचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जेव्हा एका शासकाचा दर्जा प्राप्त केला तेव्हासुध्दा ते पूर्वीसारखेच साधेपणाने राहत असत. ते सुधारकही होते व विजेतेही. त्यांनी लोकांना चारित्र्यवान बनविले. बदल्याच्या भावनेस अनुचित मानले व विनाकारण होणारे रक्तपात थांबविले. विखुरलेल्या जातीजमातीना एका संघटित समाजाचे स्वरूप दिले व त्यांना अशा नात्यात गोवले जे कौटुंबिक नात्यापेक्षा अधिक स्थायी सिध्द झाले.

त्यांनी पक्षपातग्रस्त, द्वेषयुक्त व पतित अवस्थेत असलेल्या लोकांना सत्याचा संदेश देऊन उच्चावस्था प्राप्त करून दिली. आपापसातल्या कौटुंबिक (जातिवादी) बैमनस्यातून मुक्त करून सहिष्णुता व बंधुभावाच्या नात्याने जोडले. खरोखर, मानवी कल्याणकर्त्याच्या स्वरूपात त्यांचे जगात आगमन झाले होते.''

- भारतीय सभ्यता पर मुस्लिमों के उपकार, पृ.३१

## आदर्श जीवन

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी महात्मा गांधी यांचे विचार,

''मी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या चरित्राचे अध्ययन करीत होतो. मी पुस्तकाचा दुसरा भागही समाप्त केल्यानंतर मला सुचेनासे झाले, कारण या महान प्रतिभाशाली जीवनाचे अध्ययन करण्यासाठी माझ्याकडे दुसरे पुस्तक उपलब्ध नव्हते. माझा विश्वास पूर्वीपेक्षाही अधिक दृढ झाला की, इस्लामची विश्वव्याप्ती तलवारीच्या शक्तीने साध्य झालेली नाही. इस्लामच्या विजयाचे कारण होते पैगंबरांचे साधे जीवन, त्यांची निःस्वार्थ वृत्ती, प्रतिज्ञापालन व निर्भयता, त्यांचे त्यांच्या सहकार्यावरील व अनुयायांवरील प्रेम व अल्लाहवरील दृढ विश्वास. ही तलवारची शक्ती नव्हती, उलट मुहम्मद (स.) यांचे हे सर्व विशेष गुण होते ज्यांनी सर्व अडीअडचणी दूर करून सर्व कठीण परिस्थितींवर विजय प्राप्त केला.

मला कोणीतरी सांगितले की, दक्षिण आफ्रिकेत राहणाऱ्या लोकांना त्या इस्लामच्या प्रचाराने भय वाटत आहे ज्या इस्लामने मोरक्कोला प्रकाशमय केले व जगातील लोकांना भाऊबंधासारखे जगण्याचे सुखद अनुभव दिले आहेत. वास्तविक

पाहता युरोपियन लोक इस्लामला भीत नाहीत. त्यांना भीती वाटते की, जर आफ्रिकेतील रहिवाशांनी इस्लाम स्वीकारला तर ते श्वेत जातीच्या लोकांशी बरोबरीचा अधिकार मागू लागतील. त्यांनी घाबरायलाच हवे. सर्वांत बंधुत्व निर्माण होणे त्यांना पाप वाटत असेल, कारण त्यामुळे त्यांचे वांशिक वर्चस्व कायम राहू शकणार नाही. त्यांनी अवश्य भयभीत व्हायला हवे, कारण मी पाहिले आहे की, निग्रो ख्रिस्ती झाला तरी तो गोऱ्या कातडीच्या ख्रिस्तीसमान होत नाही. मात्र तो इस्लामचा स्वीकार करताच त्याच पेल्यात पिऊ लागतो, त्याच ताटात जेऊ लागतो ज्यात इतर मुस्लिम पाणी पितात व भोजन करतात. हेच वास्तविक सत्य आहे, ज्यामुळे युरोपियन भयभीत होत आहेत.''

- जगतमहर्षि, पृ.२

## मानवता पुन्हा जीवित झाली

स्वामी लक्ष्मणप्रसाद लिहितात,

''आस्था, विश्वास, पूजा-अर्चना, नैतिकता, सामाजिकता या सर्वांचे आवाहक पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनापूर्वी जगाला आशेची किरणे दिसत नव्हती. विश्वव्यापी अंधकार व दिशाहीन परिस्थितीत संस्कृती व सभ्यतेच्या प्रकाशाचे दर्शन होत नव्हते. सौजन्य नष्टप्राय झाले होते. निसर्गाचे वास्तविक सौंदर्य व आध्यात्मिकतेचा आनंद नास्तिकतेच्या अंधकारात लुप्त झाला होता. मानवाला अल्लाहच्या अस्तित्वाचा विसर पडला होता आणि मूर्तिपूजा व इतर दुष्कर्माच्या शृंखलेत तो जखडला गेला होता. अशा परिस्थितीत मानवता पुन्हा जीवित झाली. आशिया खंडाच्या दक्षिण पश्चिमेस खाडीचा प्रदेश आहे जो अरबस्थानाच्या नावाने ओळखला जातो. याच अज्ञान व दुष्कर्माच्या केंद्रातील फारान पर्वताच्या शिखरातून तेजस्वी किरणांनी जागतिक परिस्थितीत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणले. कानाकोपरा ज्ञानाच्या झोतात प्रकाशमान झाला.

तेराशे वर्षांपूर्वी अज्ञानग्रस्त मक्का क्षेत्राच्या एका कोपऱ्यातून क्रांतिकारी आवाज ऐकू आला ज्याने अत्याचार पूर्ण वातावरणात चलबिचल निर्माण केली. त्याच ठिकाणाहून मार्गदर्शनाचा झरा वाहू लागला व मनरूपी मृतप्राय झालेल्या शेतांनी हिरवळीचे रूप धारण केले. याच वाळवंटी बगिचात आध्यात्मिकतेचे एक पुष्प पल्लवीत झाले ज्याच्या सुगंधाने मानवी मन व बुध्दीवर लिप्त असलेला नास्तिकतेचा गंध नष्ट झाला.'' -'अरब का चाँद' या पुस्तकातून

## एकेश्वरत्वाचा सदुपयोग

हिंदीचे ज्येष्ठ साहित्यकार भारतेन्दु हरिश्चंद्र लिहितात,

''ज्या काळात अरबस्थानातील लोक बहुदेवोपासने (अनेकेश्वरत्वा) च्या दाट अंधकारात चाचपडत होते, त्याच काळात महात्मा मुहम्मदांचा जन्म झाला व त्यांनी त्यांना एकेश्वरवादाचा सदुपदेश दिला. अरबस्थानाच्या पश्चिमेस येशु ख्रिस्ताचा भक्तिमार्ग प्रशस्त झाला होता. अरब व इराण इत्यादी देशावर त्याचा विशेष परिणाम झाला नव्हता. अरबासारख्या कट्टर समाजापुढे नवीन धर्माचा प्रचार करणे महात्मा मुहम्मदव्यतिरिक्त इतर कोणास शक्य झाले नसते. तत्कालीन अरब मूर्ख, स्वार्थी, निर्दयी व कट्टर पाशवीवृत्तीचे होते. मात्र काही लोक स्वतःला इब्राहीमच्या वंशातले मानत असत व मूर्तिपूजेस वर्ज्य मानत असत, पण सामाजिक दडपणामुळे सर्वच अरब बहुदेव उपासक झाले होते. अशा भयंकर परिस्थितीत मक्केत मुहम्मद या चंद्राचा उदय झाला व एकेश्वरवादाचा मार्ग दृष्टिगोचर झाला.''

- भारतेंदु हरिश्चंद्र समग्र

## संपूर्ण मानवजातीचे मार्गदर्शक :

लाला काशीराम चावला 'ऐ मुस्लिम भाई' या पुस्तकात लिहितात,

''सर्व धर्मांचे संस्थापक, मोठमोठ्या घराण्यांत जन्माला आले. त्यांच्या जन्माच्या वेळी आनंदोत्सव साजरा करण्यात आला, वाद्ये वाजविली गेली. उदाहरणार्थ, येशू ख्रिस्त, भगवान बुध्द, पैगंबर मूसा (अ.) भगवान कृष्ण, भगवान महावीर, गुरू नानक या सर्वांचे बालपण अत्यंत सुखात व वैभवात पार पडले. मात्र पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या दुःखाचा आरंभ त्यांच्या जन्माअगोदरच सुरू झाला होता.''

आदरणीय मुहम्मद (स.) यांची आई गर्भवती असतानाच अर्थात त्यांच्या जन्मापूर्वी त्यांच्या वडिलांचा मृत्यू झाला. सहा वर्षाच्या वयातच ते आईच्या प्रेमाला मुकले. दोन वर्षे आजोबांनी पालनपोषण केले. मुहम्मद (स.) यांच्या वयाच्या आठव्या वर्षी आजोबांचा स्वर्गवास झाला. नंतर त्यांचे पालनपोषण व संरक्षण काकांनी केले. अशा प्रकारे बालपण शिक्षण व सुखशांतिशिवाय घालवावे लागले. हा एक अल्लाह चमत्कार नाही का? ज्याचे बालपण इतक्या कठीण अवस्थेत गेले होते, तोच आज मानवजातीच्या विशाल जनसमूहाचा मार्गदर्शक नेता मानला जात आहे. त्यानेच

अरबसारख्या मागासलेल्या देशात निराश्रित अवस्थेत राहून साऱ्या जगाच्या लोकांना मानवतेचा संदेश दिला आहे.

कोणालाही कल्पना नव्हती की, हा एका अनोळखी कुटुंबात जन्माला आलेला निरक्षर अनाथ बालक अरबस्थानातून अज्ञानाचे साम्राज्य नष्ट करील. संपूर्ण जगात इस्लामचा संदेश पोहचविणारा 'रसूल' होईल व कुरआनचा प्रचार करणारा ''नबी'' होईल. मूर्ख लोकांमध्ये क्रांती निर्माण करणारा सुधारक होईल व एका नव्या अत्यंत वेगळ्या धर्माचा सर्वत्र प्रसार करील. स्वतः निरक्षर असूनही अत्यंत अल्पशा काळात जगाच्या फार मोठ्या जनसमूहाला शिक्षण आणि ज्ञानाने परिपूर्ण करील. त्यांनी दिलेले ज्ञान संपूर्ण मानवजातीसाठी निर्विवाद आदर्श सिध्द झाले आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उदारता व समता, सत्य व न्याय तसेच शेजाऱ्यांबाबत जे आदर्श लोकांपुढे मांडले ते निश्चितच आश्चर्यचकित करणारे आहेत. त्यांच्या सुव्यवहाराने तसेच समतेच्या भावनेने कोणीही प्रभावित झाल्याशिवाय राहिला नाही. त्यांनी संपूर्ण जीवनात कोणत्याही गुलामाला, बालकाला व जनावराला मारले नाही. एवढेच नव्हे तर त्यांनी कोणाला शिवीही दिली नाही. एकदा एका मांजरीला, तिला तहान लागली म्हणून प्रक्षालण (वुजू) च्या भांड्यातले पाणी पाजले होते. एकदा एक मांजर त्यांच्या बिछान्यात झोपल्याचे पाहून तिला न हकलता वेगळ्या ठिकाणी झोपले. त्यांनी चिमण्यांना व मुंग्याना मारू नये असा आदेश दिला. कुत्र्यांना पाणी पाजणाऱ्या अपराध्यांना क्षमादान दिले. युध्दबंदींना सन्मानजनक वागणूक दिली. अत्यंत महत्त्वपूर्ण युध्दनियम निश्चित केले. त्यानुसार स्त्रिया, बालक, वृध्द, निद्रिस्त व निःशस्त्र लोकांवर शस्त्र उगारण्याची मनाई केली. शेतातील पिकांचे व राहत्या घरांचे नुकसान करू नये अशी कायदेशीर तरतूद केली.

ते अन्य जातीच्या सरदारांचा आदरसत्कार करीत असत. अन्य धर्माच्या प्रतिष्ठित व विद्वान लोकांशी सन्मानपूर्वक भेटत. ते मित्र व शत्रू दोघांकरिता अल्लाहकडे प्रार्थना करीत. उहुदच्या युध्दात त्यांच्या चेहऱ्यावर दगड लागला व त्यांचे दात तुटून पडले तेव्हा ते उद्गारले, ''हे अल्लाह, तू माझ्या समाजाच्या लोकांना क्षमा कर, कारण त्यांना माहीत नाही (की ते काय करीत आहेत).''

ते अत्यंत दानशील व उदार मनाचे होते. याचक कोणत्याही धर्माचा व जातीचा असो, त्यांच्या दारावरून रिक्तहस्त जात नसे. त्यांचा उपदेश होता, सृष्टीच्या प्राण्यांवर दया करा व अल्लाहचे भय बाळगा. ते उधार घेऊन लोकांच्या गरजा पूर्ण करीत असत. त्यांचा आदेश होता की, युध्दात मारले गेलेल्या शत्रूंचे मृतदेह नष्ट करण्यात येऊ नयेत. स्त्रिया व बालकांची हत्या करण्यात येऊ नये. शरीराचे एक एक अवयव कापून वध करण्यात येऊ नये. शरीराचा कोणताच भाग जाळू नये.

त्यांची सत्यप्रवृत्ती, शुध्द अंत:करण प्रामाणिकता व न्यायनिष्ठेची केवळ मुस्लिमच नव्हे तर अबू जहल व अबू सुफियानसारखे कट्टर शत्रूही प्रशंसा करीत असत. माणसाचे इतरांनी केलेले गुणगानच त्यांचे खरे कौतुक असते व त्यांचे खरे दुर्गुणही तेच असतात ज्यांचा उल्लेख त्याचे मित्र नि:संकोचपणे करतात.

तत्कालीन अरब अशिक्षित, अडाणी, भांडखोर, अंधविश्वासू, जुगारी, दरोडेखोर, व्यभिचारी व वचन भंग करणारे, मुलींना जिवंत गाडून टाकणारे व आपल्या सावत्र आईशी लैंगिक संबंध ठेवणारे लोक होते. आश्चर्याची बाब म्हणजे, तेच लोक आज साध्या सरळ यात्रेकरूंचा तसेच अतिथींचा आदरसत्कार करतात, ते मेहनती, प्रामाणिक, सहकार्य करणारे, आज्ञाधारी, समतावादी व एकेश्वरवादी आहेत. अत्यंत अल्प काळात लोकांच्या आचारविचारात, स्वभावात व वागणुकीत असाधारण क्रांती घडवून आणणे; पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अलौकिक शिकवणीचा हा चमत्कारच मानायला हवा.

त्यांना इतके अधिकार प्राप्त असताना व ते स्वत: इतके प्रभावशाली असूनही त्यांच्या स्वभावात कोणताच अहंभाव निर्माण झाला नाही. एकदा प्रवासात असताना भोजन तयार करावयाचे होते. सर्व सहकाऱ्यांनी काम वाटून घेतले. सहकाऱ्यांनी मुहम्मद (स.) यांना काम करण्यापासून रोखण्याचा प्रयत्न केला तरीही त्यांनी जंगलातून लाकडे उचलून आणली व म्हटले, "मी स्वत:ला श्रेष्ठ का मानावे?"

बदरच्या युध्दाला जाताना स्वारीसाठी पुरेशी जनावरे नव्हती. लोक आळीपाळीने स्वारी करीत. त्याचप्रमाणे मुहम्मद (स.) देखील कधी उंटाच्या पाठीवर तर कधी पायी चालत होते.

यांचा साधेपणा कमालीचा होता. हे तर अगोदरच सांगण्यात आले आहे की, ते स्वत: घरकाम करीत असत. कपड्यांना ठिगळ लावणे, फाटलेली पादत्राणे दुरुस्त करणे, केरकचरा साफ करणे, जनावरांचे दूध काढणे, बाजारातून खाद्य पदार्थ आणणे, इत्यादी सर्व कामे ते नियमितपणाने करीत असत. बडेजावपणा व अवडंबराची त्यांना आवड नव्हती. जाडेभरडे कपडे परिधान करीत. नटणेसजणे त्यांना मुळीच आवडत नसे. एकदा ते आपल्या सुकन्या फातिमा (रजि.) यांच्या घराकडे गेले. तिच्या घराच्या प्रवेशद्वारावर सुंदर पडदे लावल्याचे दिसताच ते तिथूनच परत फिरले. त्यांना कारण विचारले असता ते म्हणाले, ''ज्या घरातील लोक घराच्या सजावटीत रमत असतील तेथे मला जावेसे वाटत नाही.''

ते असे का करत होते? याचे कारण असे की, त्यांना अल्लाहचे आदेश प्राप्त झाले होते की, अल्लाहप्रेमाच्या तुलनेत ऐहिक प्रेम तुच्छ आहे.

कुरआनात म्हटले आहे,

''हे अल्लाहवर विश्वास करणाऱ्यानो! तुमच्या संपत्ती व संततीच्या कारणामुळे अल्लाहच्या उपासनेकडे तुम्ही दुर्लक्ष करू नका. जो असे काही करेल त्याला नुकसान सहन करावे लागेल.''

ते संपूर्ण रात्र अल्लाहच्या उपासनेत लीन राहत. जेव्हा घरातले लोक झोपी जात तेव्हा ते बिछान्यावरून गुपचूप उठून ईशस्मरणात लीन होत. त्यांची सुपत्नी माननीय आएशा सिद्दिका (रजि.) म्हणतात, ''एका रात्री मला जाग आली तेव्हा ते बिछान्यात नव्हते. मला वाटले की, ते हरमच्या दुसऱ्या खोलीत (इतर पत्नीकडे) गेले असतील, पण नंतर अंधारात चाचपडल्यानंतर माझ्या लक्षात आले की त्यांचे पवित्र मस्तक धरतीवर टेकले होते व ते प्रार्थनेत लीन होते. मला माझ्या विचारांचा पश्चात्ताप झाला व मी खजील झाले.'' हाच आहे इस्लाम! इस्लामचा अर्थ आहे अल्लाहसमोर नतमस्तक होणे. ते जणू काही सतत अल्लाहसमक्ष उपस्थित राहत. युध्दक्षेत्रावरही ते नमाज सोडत नसत.

अल्लाहवर त्यांची दृढ श्रध्दा होती. त्यांचे म्हणणे होते की, पादत्राणाचा दोराही तुटल्यास ते अल्लाहकडे मागा. एकदा त्यांची सुकन्या माननीय फातिमा (रजि.) घरगुती कामाच्या ओझ्याने कंटाळून त्यांच्याकडे आली व दबकत दबकत

एक घरकाम करणाऱ्या सेविकेची मागणी केली.

तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''प्रिय कन्ये, तू अल्लाहवर श्रध्दा ठेव. त्याच्या आदेशांचे पालन कर. आपल्या घरवाल्यांची स्वत:च सेवा कर. जर तुला थकवा वाटत असेल तर ''सुब्हानल्लाह (अल्लाह पवित्र आहे) ३३ वेळा, ''अल् हम्दुलिल्लाह'' (सर्व प्रशंसा अल्लाहकरिता आहे) ३३ वेळा व ''अल्लाहु अकबर'' (अल्लाहच महानतम आहे) ३४ वेळा असा जप करीत जा. तुझा थकवा नाहीसा होईल.''

याला म्हणतात खरी भक्ती! याला म्हणतात खरी अल्लाहची उपासना! याचे नाव आहे अल्लाहप्रेम!

ते म्हणत असत, ''मुस्लिमाची सर्वप्रथम ओळख आहे की, तो अल्लाह व न्यायानिवाड्याच्या दिवसाचे भय बाळगतो.''

''ऐ मुस्लिम भाई,'' पृ.२५२ ते २५८

## संपूर्ण जगासाठी दयावंत

महात्मा गांधी यांचे पुत्र देवदास गांधी यांच्या निबंधातील एक अंश:

''एका शक्तिशाली सूर्यासमान पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अरबच्या वाळवंटी प्रदेशाला प्रकाशमान केले, ज्या काळी संपूर्ण जग. अंधकाराने आच्छादित होते व जेव्हा ते काळाच्या पडद्याआड गेले तेव्हा त्यांना सोपविलेली कामगिरी पूर्ण झाली होती. त्यांनी केलेल्या पवित्र कामाचा लाभ संपूर्ण जगाला त्याच्या अंतापर्यंत मिळणार आहे. जगात खरे मार्गदर्शक फार थोडे झाले आहेत व त्यांच्या कार्यकाळात बरेच मोठे अंतर होते. ज्या लोकांनी मुहम्मद (स.) यांच्या जीवनचरित्राचे शुध्द मनाने व पूर्ण श्रध्देने अध्ययन केले आहे, त्यांनी निश्चितपणे मान्य केले आहे की, ते महान धर्म उपदेशक होते. त्यांनी ज्या काळात धर्मोपदेशाचे कार्य केले, त्या काळात अरबभूमी आध्यात्मिक व नैतिकदृष्ट्या अत्यंत निम्नस्तरावर होती. त्या पृष्ठभूमीचा विचार केल्यास त्यांची प्रतिमा अधिक उजळ असल्याचे जाणवते.

मुहम्मद (स.) यांचा सभ्य व उन्नत वातावरणात जन्म झाला नव्हता.

त्यांच्या काळात एकही असा माणूस नव्हता की ज्याच्याकडून ते आध्यात्मिक शिक्षण प्राप्त करू शकले असते. त्या काळात अरबस्थानात अल्लाही धर्माचा लवलेशही नव्हता. संपूर्ण अरबस्थान अंधकारात बुडालेला होता. दुष्ट वातावरण व मानवी अध:पतन चरमसीमेला पोहचले होते. त्या काळात अल्लाही अनुकंपेच्या स्वरूपात मुहम्मद (स.) यांचा उदय झाला. अशा परिस्थितीत त्यांना जर 'रहमतुल्लिल आलमीन' (जगासाठी दयावंत) अशी पदवी दिली गेली तर यात आश्चर्य वाटण्याचे काही कारण नाही.

त्यांचे पवित्र जीवन कथनी व करनीचा मिलाफ होते. त्यांचा जीवननियम होता की "आधी केले मग सांगितले." त्यांनी कधीही अशा कार्याची शिकवण लोकांना दिली नाही ज्याचे उदाहरण त्यांनी स्वत: घालून दिले नसावे.

त्यांच्या पवित्र जीवनात पैगंबरत्वप्राप्तीनंतरही विशेष अंतर निर्माण झाले नाही. त्यांनी संपूर्ण जीवन सरळ व साध्या पध्दतीने व्यतीत केले. अनेक साम्राज्यांची संपत्ती उपलब्ध असतानाही त्यांना ऐहिक सुख व भोगविलासने कधीच आकर्षित केले नाही. त्यांचे भोजन अत्यंत अल्प व फारच साधे होते, कारण जेवण जीवनाकरिता आवश्यक आहे. ते चटाईवर व बारदानावर झोपत असत. त्यांचे वस्त्रही साधेसुधे असे. त्यांनी कधीही कोणाकरिता अपशब्दांचा वापर केला नाही. युध्दाच्या मैदानावरसुध्दा ते शत्रूशी अत्यंत सौम्य भाषेत बोलत असत. खरे सांगायचे म्हणजे त्यांना आपल्या इच्छा व मनोकामनांवर पूर्ण संयम प्राप्त होता. गीतेमध्ये कर्मयोगीच्या ज्या गुणांचा उल्लेख आहे त्या सर्वांचा त्यांच्या चारित्र्यात पुरेपूर समावेश होता. ते त्यांच्या नावडत्या कर्तव्यांचेसुध्दा अत्यंत निष्ठा व दृढतेने पालन करीत असत. स्वार्थ व घमेंड त्यांच्या मनास कधीच अस्थिर करू शकली नाही. कर्मयोगी त्या व्यक्तीला म्हणतात जी आपल्या उत्तम विचारांना मूर्त स्वरूप देते. मुहम्मद (स.) एक असेच व्यक्ती होते. मनुष्य असूनही त्यांच्यात अलौकिक गुण होते. सुख, दु:ख, हर्ष, क्षोभ इत्यादींच्या प्रभावाखाली साधारण माणसे जीवन व्यतीत करीत असतात व त्या भावनांच्या प्रभावाने त्यांच्या जीवनात परिवर्तन घडून येते. मात्र मुहम्मद (स.) भावनांनी कधीही प्रभावित झाले नाहीत.

जे लोक वर्तमान समाजव्यवस्थेत व जीवनप्रणालीमध्ये परिवर्तन आणू इच्छितात व समाजाचे नवनिर्माण करू पाहत आहेत, त्यांच्यावर मुहम्मद (स.) यांनी मेहनत-मजुरीसंबंधी जे आदर्श घालून दिलेत, त्यांचा विशेष प्रभाव पडेल.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी व्यावहारिक उदाहरणे प्रस्तुत केली. त्यांचा लोकांना विसर पडला आहे. ते स्वतःचे वस्त्र स्वतःच दुरुस्त करीत असत. एवढेच नव्हे तर ते स्वतःच्या बूट-चपला स्वतः दुरुस्त करीत असत. ते घरकामात नोकरचाकरांना मदत करीत असत. मशीदीच्या बांधकामात मजुरांबरोबर काम करीत असत. मजुरांबरोबर काम करताना ते त्यांच्यात इतके मिसळून जात की कोणी त्यांना ओळखू शकत नसत.

त्यांना मुले खूप आवडत असत. त्यांच्याबरोबर ते खूप खूश राहत. ती भाग्यशाली मुले ज्यांना त्यांचा सहवासाचा आनंद मिळाला, त्यांना स्वतःच्या घरातसुद्धा इतका आनंद मिळाला नसेल. बालकांच्या सहवासात राहणे त्यांच्याकरिता काही योगायोग नव्हता. त्यांचा हा नियमित कार्यक्रम होता. ते बालकांना शोधून काढीत व आपले आदर्श विचार त्यांच्या मनावर बिंबविण्याचे प्रयत्न करीत. यापेक्षा शिक्षण व उपदेशाचा अधिक प्रभावी दुसरा कोणता मार्ग असू शकतो?''

मासिक 'पेशवा' दिल्ली, जुलै १९३१

## अनुपम जीवन

हिंदीचे प्रख्यात साहित्यकार सरदार पूर्णसिंह 'अध्यापक', साहित्यिक उपमांचा प्रयोग करून लिहितात,

''बघा 'हिरा' गुफेत एक अनाथ, जगापासून लपून छपून विचित्र निद्रावस्थेत आहे. गल्लीतल्या दगडाकडे जसे कोणी लक्ष देत नाही तसेच सामान्य माणसासारख्या या अनाथालाही कोणी ओळखत नव्हते. एका उदार धनवान महिलेकडे तो नोकरी करत होता. त्याची सामाजिक प्रतिष्ठा केवळ एका गुलामासारखी होती. अचानक काहीतरी अल्लाही चमत्कार घडला ज्यामुळे या अपरिचित व अनोळखी व्यक्तीला दिव्यदर्शन घडले. तो जागा झाला. जगावर असंख्य वजांचा लखलखाट झाला. अरबस्थानात जणू विस्फोट होऊन आगीचे डोंब निर्माण झाले. या महापुरूषाच्या नेत्रातील ज्वालेने इंद्रप्रस्थ ते स्पेनपर्यंतचा भूभाग प्रज्वलित झाला. हिरा गुफेत झोपणाऱ्या अज्ञान इसमाने हाक दिली. संपूर्ण पृथ्वी भयभीत झाली. होय, जेव्हा मुहम्मद (स.) ने ''अल्लाहु अकबर'' (अल्लाह सर्वश्रेष्ठ आहे) ची घोषणा दिली, तेव्हा संपूर्ण जग स्तब्ध झाले. काही काळानंतर निसर्गाने घोषणेचा प्रतिध्वनी चारी दिशांना पसरविला. पक्षी 'अल्लाहु अल्लाहु' गाऊ लागले व मुहम्मद (स.) यांचा संदेश

इकडे तिकडे घेऊन उडू लागले. पर्वत त्यांच्या वाणीने वितळू लागले. नद्या 'अल्लाहु अल्लाहु' सूर अलापत पर्वतावरून घसरू लागल्या. जे लोक त्यांच्यासमोर आले त्यांचे दास झाले. चंद्र, सूर्याने आळीपाळीने नमस्कार केला. त्यांच्या प्रभावाची तीव्रता तर बघा, शेकडो वर्षानंतर आजही जगाच्या बऱ्याचशा भागातले लोक त्यांच्या नावाचा आदर करतात, स्वतःच्या अल्पकालीन जीवनास तुच्छ मानतात. ज्याचे नाव व ज्याच्या जीवनाचा अहवाल केवळ ऐकून व वाचून माहीत झाला आहे अशा महात्म्याच्या आदर्श जीवनाकरिता आपले संपूर्ण जीवन समर्पित करण्यास नेहमी उत्साहित असतात.''

- सरदार पूर्णसिंह 'अध्यापक'

## विश्वबंधुत्व व मानवसमानतेचे संस्थापक

दिल्लीचे प्रसिद्ध राष्ट्रीय नेता व दैनिक समाचार पत्र 'तेज'चे संचालक लाला देशबंधु गुप्त लिहितात,

''पैगंबर मुहम्मद (स.) एक धार्मिक नेता होते. त्यांचे संपूर्ण जीवन इस्लामप्रचारात व्यतीत झाले. त्यांची संपूर्ण शिकवण म्हणजेच इस्लामची शिकवण आहे. मात्र याचा अर्थ असा होत नाही की, मुस्लिमेतर लोक त्यांच्या शिकवणीचा लाभ घेऊ शकत नाहीत. त्यांनी अरबस्थानातील सर्व रानटी लोकांवर उपकार केले, त्यांचे इतिहासाला कधीच विस्मरण पडणार नाही. जो प्रदेश दीड हजार वर्षांपूर्वी सभ्यता व संस्कृतीच्या नावालाही परिचित नव्हता, जिथे कलाकौशल्याचे नावही नव्हते, जेथील लोक लुटालुटीने उपजीविका चालवीत होते, हत्या व रक्तपात करीत होते, जेथे मूर्तिपूजा व अंधविश्वासाचे अधिपत्य होते, तो प्रदेश आज सभ्य देशांच्या पंक्तीत उभा आहे. हे उत्तम आदर्श स्थापित करून त्यांनी जगात मानवी समानतेच्या सन्मानजनक भावनांना प्रोत्साहित केले आहे. हे असे काम होते की, ज्याने केवळ इस्लामी राष्ट्रांचाच कायापलट केला नसून अन्य देशांवरही प्रभाव टाकला आहे. मुहम्मद (स.) यांचे एक विशेष व महान कार्य असे की, त्यांनी अरबस्थानातून गुलामगिरीची मानवताहीन प्रथा संपुष्टात आणण्याचे यशस्वी प्रयत्न केले. त्यांनी इस्लामच्या अनुयायांना उपदेश दिला की, गुलामांना मुक्त करणे सर्वांत मोठे पुण्य कार्य आहे व जन्माने गुलाम असलेली कोणतीही व्यक्ती धार्मिक नेता वा उच्च शासक होऊ शकते. इस्लामी इतिहास साक्ष आहे की, जन्माने गुलाम व्यक्ती खलीफाच्या उच्च पदावर आसीन झाले व त्यांनी आपल्या सत्कर्म

व उत्तम गुणांच्या आधारे तत्कालीन इस्लामी समाजाचे नेतृत्व केले.

- तर्जुमान, १९ जुलै, १९३३

## सरळ सोपा मार्ग दाखविणारे

अविभाजित पंजाबचे प्रसिध्द काँग्रेसी नेता व विद्वान डॉक्टर सत्यपाल लिहितात,

''ज्या काळात पैगंबर मुहम्मद (स.) यांचा उदय झाला त्या काळात सर्वत्र मूर्तिपूजा केली जात होती. सर्वत्र अनेकेश्वरवादाचे प्रस्थ होते. एकेश्वरवादाचा ऱ्हास झाला होता. अत्याचार, दडपशाही, बलात्कार, हिंसा इत्यादी पापकृत्ये करताना अल्लाहचे भय बाळगले जात असे, मात्र अल्लाहची उपासना केली जात नव्हती. अंधविश्वास व धार्मिक अवडंबरांचा जोर होता. अल्लाही आदेशांचे नाममात्रही पालन केले जात नव्हते. अशा वातावरणात मुहम्मद (स.) यांनी अल्लाहच्या एकत्वाची घोषणा इतक्या मार्मिक व शास्त्रशुध्द ज्ञानाने केली की तिचा प्रतिध्वनी संपूर्ण अरबस्थानात पसरला व एक वेगळे जग निर्माण झाले. त्यांना अनेक कष्ट दिले गेले, कारण ते एकमेव अल्लाहचा संदेश देत होते. त्यांना लोकांनी बरेच छळले, कारण ते केवळ एकाच अल्लाहची उपासना करा म्हणून सांगत होते. परंतु अशा महान व तेजस्वी व्यक्ती अशा संकटांनी भयभीत होत नाहीत, कारण त्यांना अल्लाहचे संरक्षण प्राप्त असते. ते लोकांचे भय बाळगत नाहीत. त्यांना लोक काय म्हणतात याची चिंता नसते कारण त्यांना अल्लाहचा आधार प्राप्त असतो. जग त्यांना विकत घेऊ शकत नाही. ते अपमानाने घाबरत नाहीत व प्रशंसेने मोहित होत नाहीत. त्यांच्या दृष्टीत या गोष्टींचे कोणतेच मूल्य नसते. सर्वसामान्य लोकांचा गैरसमज आहे की मुहम्मद (स.) एका विशेष समाजाचे वा जातीचे व देशाचे मार्गदर्शक आहेत. हे सत्य आहे की आज कोट्यवधी मुस्लिम दिवसातून कितीतरी वेळा अल्लाहच्या या पवित्र संदेशदात्याचे नाव मोठ्या श्रध्दा व प्रेमाने उच्चारित असतात. पण सत्य वेगळेच आहे मुस्लिमांच्या संख्येपेक्षाही अधिक लोक मनोमन मुहम्मद (स.) यांच्यावर असीम श्रध्दा बाळगतात व त्यांनी बहकलेल्या मानवजातीला सत्यमार्ग दाखविला व मानवतेचा पाठ दिला, या उपकाराची त्यांना अहर्निश जाणीव असते.''

-'तर्जुमान', वाराणसी, जुलै १९३०.

# मानवजीवनाचे सर्वोत्तम उदाहरण

राजा राधाप्रसाद सिंह यांचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जन्मदिवशी आयोजित सभेत दिलेल्या भाषणातील काही अंश,

''विश्व-भूगोल व इतिहासाच्या पृष्ठाने जगाचा एकही कोपरा वा क्षेत्र दाखविलेले नाही की जेथे मानवी समूहाच्या प्रत्येक जाती व वंशाच्या लोकांचे चरित्र व स्वभाव सुधारण्याकरिता व परिमार्जित करण्याकरिता अल्लाहने पैगंबर, अवतार, मार्गदर्शक, संदेशवाहक पाठविलेले नाहीत. 'वलि कुल्लि कौमिन आद.' (कुरआनातील श्लोक) या श्लोकाने सिध्द होते की पूर्व वा दक्षिण, सर्वच भागात मानवजातीच्या सुधारणेसाठी देश व समाजाच्या उन्नती व नैतिक विकासासाठी निश्चितच कोणीतरी (पैगंबर) नियुक्त झाला होता.

जर आम्ही कोणत्याही पैगंबर व अवताराच्या जीवनचरित्राचे व जीवन-घटनांचे संशोधन केले तर आमच्या दृष्टिक्षेपात सर्व घटना व वातावरण येणार नाही. मात्र सद्‌गुणांचे स्रोत मुहम्मद (स.) यांच्या जीवनाचे वैशिष्ट्य आहे की, त्यांच्या जीवनाचे संक्षिप्त अध्ययनाने त्यांच्या समग्र जीवनाचे स्पष्ट चित्र डोळ्यांसमोर रेखाटले जाते. मुहम्मद (स.) यांच्या जीवनातल्या छोट्याछोट्या घटनांचे वर्णन करावयाचे झाल्यास मोठमोठे ग्रंथ लिहावे लागतील. या संक्षिप्त लेखात परिपूर्ण प्रकाशमय ज्योती, सत्य व पावित्र्याच्या मूर्त स्वरूपाच्या आदर्श आचरणाबाबत सविस्तर वर्णन देणे शक्य नाही. कुरआनात म्हटले आहे, ''तुमच्याकरिता पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन सर्वोत्तम आदर्श आहे.'' सन्मानित श्रोतेगणांच्या मनास (आत्म्यास) प्रफुल्लित करण्याकरिता त्यांच्या जीवनाच्या काही प्रमुख घटना आज मी प्रस्तुत करण्याचा प्रयत्न करीत आहे.''

- 'जगतमहर्षि', पृ.२९३

# माझा भ्रम नाहीसा झाला

नामवंत स्वातंत्र्यसेनानी बाबू मुकुटधारी प्रसाद यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याबाबत म्हटले आहे की, ''मुहम्मद (स.) व इस्लामबाबत माझे आज जे मत आहे ते पूर्वी नव्हते. माझ्या मनात त्यांच्याविषयी तिरस्काराची भावना होती आणि मला त्यांच्यात व त्यांच्या धर्मात कोणतेच विशेष गुण दिसत नसत. मात्र जेव्हा मी असहकार आंदोलनात तुरुंगात गेलो व तेथे पैगंबरांच्या चरित्राचे अध्ययन केले तेव्हा मला जाणीव झाली की मुहम्मद (स.) यांचे जीवन उदात्त गुणांनी परिपूर्ण होते. आज मी ज्या उच्च पदावर आहे त्याचे कारण त्यांच्या आदर्श जीवनाच्या अध्ययनाचा परिणाम आहे.

अरबस्थानाच्या इतिहासावरून स्पष्ट आहे की, मुहम्मद (स.) यांच्या धर्मप्रचारकार्यापूर्वी तेथील समाज अत्यंत अडाणी, पाशवीवृत्तीचा, दिशाहीन व मद्यपानासारख्या दुर्गुणांनी ग्रासलेला होता, परंतु केवळ २३ वर्षांच्या अल्पकाळातच त्यांच्या धार्मिक तत्त्वज्ञानाच्या प्रभावाने त्या मूर्ख व रानटी लोकांचा कायापालट झाला. त्यांच्या शिकवणी (उपदेश) बेसुमार आहेत, पण मला ज्या विशेष प्रिय वाटतात व ज्या सर्वांसाठी कल्याणकारी व व्यावहारिक आहेत त्यांचे वर्णन करीत आहे.

सर्वप्रथम मला 'समता' बाबत बोलावेसे वाटते. मालक असो वा गुलाम, धनी असो व निर्धन, गोरा असो की काळा, इस्लामने सर्वांना समान दर्जा दिला आहे. मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीत वंशवाद व उच्चनीचतेच्या भावनेस थारा नाही. नावलौकिक व सामाजिक प्रतिष्ठा कर्मांच्या कसोटीवर निश्चित करण्यात येते.

सज्जनहो, लोक म्हणतात की, 'इस्लामचा तलवारच्या शक्तीने प्रसार करण्यात आला आहे' तुम्हाला गंमत वाटेल माझेही हेच विचार होते, पण ती कोणती तलवार होती? ती तलवार होती काय? नाही, मुहम्मद (स.) यांची सतशीलवृत्ती, क्षमाभाव, शुध्द आचारविचार, त्यांचे इतर सद्‌गुण व जगाच्या अंतापर्यंत अंत न पावणाऱ्या त्यांच्या आदर्श उपदेशांच्या चमचमणाऱ्या तलवारीने लोकांच्या माना कापण्याऐवजी लोकांच्या हृदयांना एका दोऱ्यात ओवण्याचे काम केले. इस्लामची लोकप्रियता व प्रसिद्धी याच कारणाने वाढली आहे. जी बाब अत्याचार व शक्तीच्या आधाराने स्थापित केली जाते, ती स्थायी व फलदायक सिध्द होत नाही. मुहम्मद (स.) यांचे अत्यंत उच्च तत्त्वज्ञान व सदाचारांच्या चमत्कारानेच इस्लाम आजपर्यंत कायम आहे. मी नि:संकोचपणे मान्य करतो की, मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीच्या आधारावर आजही संपूर्ण जगात इस्लाम सर्वांत अधिक लोकप्रिय आहे.'' -

'जगत महर्षि', पृ. ६२६८

# महान नेता

'हिंदुस्तान टाईम्स' दिल्लीचे माजी संपादक बी. एन. साहनी 'गलत मज़हबों का काफ़िर' या आपल्या लेखात लिहितात,

''मुहम्मद (स.), ईसा (अ.) आणि गौतम बुध्द यांच्यासारख्या महात्म्यांना त्यांच्या काळात घृणापूर्ण व अपमानास्पद वागणूक देण्यात आली होती. प्रत्येक सत्यधर्म प्रवर्तकाच्या बाबतीत अधर्मी लोकांनी (खोट्या धर्माच्या उपासकांनी) असे दुष्कृत्य केल्याचे दिसून येते. मुहम्मद (स.) यांनाही सत्य धर्माचा महान अग्रणी नेता मानून मी त्यांचा सन्मान करण्यास विवश आहे.

त्यांनी अतुलनीय साहस व दृढतापूर्ण असे काम केले की, त्यांना कित्येक वेळा मृत्यूचा सामना करावा लागला. त्यांनी तत्कालीन धर्मसिध्दान्तांना संपुष्टात आणले व एका अशा धर्माची पायाभरणी केली की ज्यामुळे तत्कालीन सभ्यतेत क्रांती निर्माण झाली. एवढेच नव्हे तर येणाऱ्या काळात जगाच्या विविध भागात वसाहत करून राहणाऱ्या कोट्यवधी लोकांना मार्गदर्शन प्राप्त झाले.

इस्लामचे प्रवर्तक मुहम्मद (स.) यांचे व्यक्तिमत्त्व जितके पवित्र व उत्तम होते तितकीच त्यांच्यात आकर्षणशक्तीही होती. ज्या प्रकाराचे मन व बौध्दिक शक्ती त्यांना प्राप्त होती तशी जगाच्या इतिहासात फारच थोड्या लोकांना प्राप्त झाली असावी. या पवित्रात्म्या (पैगंबर) ने शेकडो वर्षांपूर्वी त्यांच्या अनुयायांसाठी जी जीवनव्यवस्था तयार केली होती तिच्या दोन गोष्टींकडे प्रत्येक व्यक्तीचे लक्ष वेधले जाते. ही किती आश्चर्यकारक बाब आहे, की लोकतंत्राच्या या युगातही सामाजिक व बौध्दिक समतेचे जे उच्च स्तर आम्ही कायम करू शकलो नाही त्या स्तराची कल्पना महामहिम पैगंबराने शेकडो वर्षांपूर्वी जगापुढे मांडली होती व जगातील मुस्लिमांनी एका समाजाच्या स्वरूपात आपल्या दैनिक जीवनात आचरणात आणली आहे.

राजनैतिक लोकशाहीतसुध्दा काही विशेष बाबी असतात. हे खरे आहे की जे राजनैतिक नियम जनतेस राज्यव्यवस्थेच्या स्थापनेस विघ्न सिध्द होतात, ते निश्चितच अन्यायकारक आहेत. परंतु केवळ राजनैतिक लोकशाहीने काम होत नाही व लोकशाही जीवनपध्दतीची त्याने पूर्तताही होत नाही. लोकशाहीच्या यशाचे मोजमाप करायचे असेल तर त्याच व्यवस्थेने एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याचा किती सन्मान करतो व एक समाज दुसऱ्या समाजाशी कसा व्यवहार करतो, यावर

अवलंबून आहे.

जगातील धर्मांपैकी केवळ इस्लामच असा एक धर्म आहे ज्याने जाहीर केले आहे की, त्याला लोकशाहीचा खरा संदेश देणारा पैगंबर मिळाला आहे.

इस्लामने स्त्रियांना जे अधिकार दिलेत ते सर्वांत अधिक उल्लेखनीय आहेत. स्त्रियांना इस्लाम व ख्रिश्चन धर्माने समाजात पुरुषांबरोबर वावरण्याचे भरपूर स्वातंत्र्य दिले आहे ही सत्य बाब आहे. मात्र वारसाहक्क, खुला (घटस्फोट मागण्याचा अधिकार), वैधानिक व मिळकतीचा अधिकार इत्यादी विषयांत इस्लामच्या प्रवर्तकाने स्त्रियांना असे स्वातंत्र्य प्रदान केले आहे जे प्रत्येक देशातील धार्मिक नेता आपल्या महिलांना देण्याची इच्छा बाळगत आहेत.''

-मासिक 'पेशवा', जुलै १९३१

## अद्वितीय व्यक्तिमत्त्व

जगप्रसिध्द इंग्रज विद्वान मायकल एच. हार्ट याने जगाच्या १०० महापुरुषांच्या जीवनावर 'द हंड्रेड' नावाचे पुस्तक प्रकाशित केले आहे. या पुस्तकात मुहम्मद (स.) यांना मायकल एच. हार्टने प्रथम स्थान दिले आहे. मायकल हार्टने मानव इतिहास व संपूर्ण जगातील महापुरुषांच्या सर्वाधिक व्यक्तिगत प्रभावास निवडीचे आधार मानले आहे. त्यांच्याच शब्दांत,

''जगाच्या सर्वाधिक प्रभावशाली व्यक्तींमध्ये मुहम्मद (स.) यांना प्रथम स्थान दिल्याने काही वाचकांना आश्चर्य झाले असेल व काही प्रश्नही निर्माण केले जात असतील. खरे म्हणजे मानव - इतिहासात तेच एकमात्र असे व्यक्ती आहेत जे धार्मिकता व धर्मनिरपेक्षता या दोन्हीच्या बाबतीत सर्वाधिक सफल झाले. उच्च घराण्यात जन्मलेल्या व पालनपोषण झालेल्या मुहम्मद (स.) यांनी जगाच्या मोठ्या धर्मांपैकी एका (इस्लाम) धर्माची स्थापना केली व अशा कौशल्याने त्याचा प्रचार-प्रसार केला की त्याच्या आधारावर ते जगाचे सर्वाधिक प्रभावशाली राजनेता झाले. त्यांच्या देहांच्या तेराशे वर्षानंतर आजही त्यांचा प्रभाव सर्वाधिक शक्तिशाली व व्यापक सिध्द होत आहे.''

मायकल हार्ट यांनी पुढे म्हटले आहे,

''यासाठी आम्ही पाहतो की, मानव इतिहासात सातव्या शतकात अरबांद्वारा जे विजय अभियान सुरू केले होते ते आजही महत्त्वपूर्ण भूमिका बजावत आहे. धर्मनिरपेक्षता व धार्मिकता या दोहोंच्या अतुलनिय सुवर्ण-मोती मिलनाने, मुहम्मद (स.) यांना मानव इतिहासाचा एकमात्र सर्वाधिक प्रभावशाली व्यक्ती सिध्द केले आहे.''

-मायकल एच. हार्ट 'दि हंड्रड', पृ. ४०

# अद्वितीय दया व क्षमाभाव

स्वामी भवानी दयाल संन्यासी दक्षिण आफ्रिकेचे विख्यात भारतीय नेता व नेटाल इंडियन नॅशनलचे माजी उपाध्यक्ष होते. एकदा पैगंबर जयंतीच्या कार्यक्रमात डेहरी (शाहाबाद) येथे आयोजित एका विशाल सभेचे त्यांना अध्यक्षस्थान देण्यात आले होते. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा काही अंश खाली दिला जात आहे.

"आज मुहम्मद (स.) यांचे जगात बेसुमार अनुयायी आहेत. परंतु त्यांच्या सत्यधर्माच्या आवाहनास लोकांनी लगेच स्वीकारले होते काय? त्यांच्या आदेशांना सहज मान्य केले होते काय? नाही, तसे झाले नाही. जर असे काही घडले असते तर त्यांची सहनशीलता, दृढता, अतुलनीय दया व क्षमाभाव याव्यतिरिक्त अनेक उत्तम गुण पडद्याआड अदृष्य राहिले असते व जगाला त्यांचा परिचय झाला नसता. मुहम्मद (स.) यांना सुरूवातीस त्या सर्व अडीअडचणींना तोंड द्यावे लागले जे इतर सर्व महान समाजसुधारकांना सहन कराव्या लागतात. या महान सुधारकास आपल्या महान उद्देशात सफल होण्यासाठी भयंकर कष्ट सहन करावे लागले. मात्र मुहम्मद (स.) यांनी आपले बेजोड धैर्य व धाडस खचू दिले नाही व सतत इस्लामचा प्रचार करीत राहिले. सत्य कथन करताना कधी कचरले नाहीत. शेवटी मुहम्मद (स.) सफल झाले व त्यांच्या जीवनकालात संपूर्ण अरबस्थानातून दुराचाराचे उच्चाटन झाले व स्वच्छ समाजाची निर्मिती झाली.

मुहम्मद (स.) यांचे धाडस, शौर्य, धैर्य व दृढतेमुळे मुस्लिमांसारखा शूर व ईशउपासक 'समाज' निर्माण झाला. काही काळापूर्वी सर्वत्र त्यांचेच साम्राज्य होते. साऱ्या जगात त्यांच्या नावाचे वर्चस्व गाजत होते, व दूसरी कोणतीही जात-जमात त्यांचा मुकाबला करू शकत नव्हती. हेच मुस्लिम आज इतके पतित व दिशाहीन का दिसत आहेत? ते दुसऱ्याचे दास का होत आहेत? याचे मुख्य कारण म्हणजे ते मुहम्मद (स.) यांनी दिलेल्या मार्गदर्शनपर उपदेशाचे पालन करण्यात हलगर्जीपणा करीत आहेत. त्यांचे अनुयायी आपली गमावलेली प्रतिष्ठा पुन्हा प्राप्त करू शकतील. मात्र त्याकरिता त्यांना मुहम्मद (स.) यांचे सशक्त आत्मबल, दृढता, धाडस, शौर्य तसेच सदाचार व औदार्य पुन्हा आचरणात आणावे लागतील. मित्रांनो, मी मुस्लिमेतरांनाही आवाहन करीन की, त्यांनी मुहम्मद (स.) यांना आदर्श मानून त्यांच्या उत्तम शिकवणुकीवर आचरण करून यश प्राप्त करावे."

- जगतमहर्षि, पृ. १२

# क्रांतिकारी संदेश

तामिळनाडूचे माजी मुख्यमंत्री अन्नादुरई म्हणतात,

"विरोधाच्या वादळात ते खंबीरपणे अल्लाहचे क्रांतिकारक संदेश देत राहिले. हा त्यांच्या महानतेचा पुरावा आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जेव्हा लोकांना उपदेश देण्यास सुरूवात केली तेव्हा सतत १३ वर्षापर्यंत त्यांना व त्यांच्या साथीदारांना भयंकर त्रास दिला गेला. या अवधीत पवित्र कुरआनच्या ज्या आयती प्राप्त झाल्या त्यात सदाचारात दुर्व्यवहाराचे उत्तर सद्व्यवहाराने द्यावे व सर्व प्रकारचे जुलूम एकनिष्ठ होऊन व धैर्याने सहन करीत राहण्याचे आदेश मिळाले आहेत. नंतर मुहम्मद (स.) मदीना येथे पोहचले तेव्हा तेथेही त्यांच्यावर हल्ला करण्यात आला. या बिकट परिस्थितीत मुहम्मद (स.) व त्यांच्या साथीदारांना स्वसंरक्षणार्थ लढण्याची अनुमती मिळाली. नंतर मुहम्मद (स.) व त्यांच्या साथीदारांवर मर्यादेपलीकडे जुलूम होऊ लागले व सहनशीलतेची सीमा पार होऊ लागली तेव्हा त्यांना युध्दाची परवानगी देण्यात आली. या संदर्भात पाश्चात्य विद्वान एडवर्ड गिब्सन म्हणतात, "प्रत्येक व्यक्तीस आपली व आपल्या संपत्तीची शस्त्रास्त्राच्या आधारे सुरक्षा करण्याचा अधिकार आहे."

# सर्वाधिक प्रभावकारी व्यक्तिमत्त्व

प्रा. के. एस. रामकृष्ण राव त्यांचे प्रसिध्द पुस्तक "इस्लाम के पैगम्बर मुहम्मद" मध्ये ते लिहितात,

"मुहम्मद (स.) यांचा जन्म अरबस्थानच्या वाळवंटी प्रदेशात मुस्लिम इतिहासकारांनुसार २० एप्रिल इ. सन ५७१ रोजी झाला. 'मुहम्मद'चा अर्थ आहे "ज्याची खूप प्रशंसा होते." माझ्या मतानुसार ते अरब समाजातील प्रतिष्ठित व प्रभावी व्यक्तींपैकी सर्वांत उच्चकोटीचे बुध्दिमान व महाज्ञानी व्यक्ती होते. त्यांच्यापूर्वी व त्यांच्यानंतर अरबस्थानाच्या वाळवंटात जन्मलेल्या कवि व शासकांपैकी कोणीही त्यांच्यापेक्षा जास्त प्रभावी झाला नाही.

जेव्हा त्यांचा जन्म झाला तेव्हा अरबस्थान एक ओसाड वाळवंट होते. मुहम्मद (स.) यांच्या आगमनाने या ओसाड वाळवंटात एक नवचैतन्य निर्माण झाले.

एक नवे जीवन, एक नवी सभ्यता, एक नवी संस्कृती अस्तित्वात आली. त्यांच्या प्रयत्नाने एक असे साम्राज्य निर्माण झाले जे मोरक्को ते इंडीजपर्यंत पसरले, व तीन महाद्वीप (खंड) एशिया, आफ्रिका व युरोपातील लोकांचे आचार विचार प्रभावित झाले. इस्लामचा सिध्दान्त ''धर्माच्या बाबतीत कोणतीच जोरजबरदस्ती नाही.'' आज सर्वांना माहीत झाला आहे. विश्व विख्यात इतिहासकार गिब्ज याने म्हटले आहे, ''मुस्लिमांवर हे लांछन उगीचच लादण्यात आले आहे की, त्यांचे हे कर्तव्य आहे की इतर सर्व धर्मांच्या लोकांचे तलवारीने उच्चाटन करण्यात यावे.'' त्याच इतिहासकाराचे म्हणणे आहे, ''हा विषारी प्रचार कुरआनने पूर्णतः खोडून काढला आहे. मुस्लिम विजेत्याचा इतिहास व खिस्ती धर्मीयांप्रति सार्वजनिक उदारतेच्या व्यवहाराने हे सिध्द होते की हे लांछण तथ्यहीन आहे.''

## अत्यंत सोपा (सुगम) मार्ग

डॉक्टर ताराचंद यांनी मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीबाबत म्हटले आहे,

''ज्या धर्माचा मुहम्मद (स.) यानी प्रचार केला तो अत्यंत सरळ आहे. यात फारच थोडे धार्मिक तत्त्व व आचारणाबाबतचे नियम आहेत. कुरआनानुसार, अल्लाह मनुष्याला त्यावर पडलेले अनिष्ट बंधनांचे ओझे कमी करून धर्माचरण सोपे करू इच्छितो. या धर्माचे प्रमुख तत्त्व आहे. एकेश्वरवाद या धर्माचा केंद्रीय सिद्धान्त आहे. सर्वाधिक महत्वपूर्ण कार्य आहेत. दिवसातून पाच वेळेची नमाज, वर्षातून रमजान महिन्याचे रोजे, वर्षभर शिल्लक असलेल्या निधीतून अडीच टक्के जकात (दान) देणे व जीवनात एकदा सधन व सबळ माणसाने हज करणे. इस्लामचे हे स्तंभ आहेत. सामाजिक व्यवस्थेबाबत सर्वांत आकर्षक विशेषता म्हणजे सर्व मुस्लिमांना समान दर्जा प्राप्त असतो व सर्व आपापसात एकमेकांच्या बांधवासारखे असतात. इस्लामला जातीवाद मान्य नाही.''

## बंधुत्व व समानतेची शिकवण

प्रसिध्द विद्वान के. एम. मुन्शी म्हणतात, मुहम्मद (स.) यांची शिकवण आमच्यात जाणीव निर्माण करते की, आपापसातल्या व्यवहारात, बंधुत्व व समानतेने वागले पाहिजे. खरे म्हणजे वंश, वर्ण, धर्म व जातीजमातीच्या आधारावर विभक्त झालेल्या आजच्या जागतिक समाजाला अशाच तत्त्वांची नितांत गरज आहे.

## वैश्विक प्रेम आणि कृपेची पवित्र भावना

'सत् उपदेश'चे संपादक महोदय लिहितात,

"हा एक सार्वत्रिक विचार आहे की, इस्लाम तलवारीच्या जोरावर फैलावला आहे. परंतु आम्ही याचा स्वीकार करूच शकत नाही. कारण बळजबरीने बळकावलेली वस्तू लवकरच त्या अत्याचाऱ्यापासून परत घेतली जाते. जर इस्लामचा प्रचार अत्याचाराने झाला असता तर इस्लामने नाव आज शिल्लक राहिले नसते, परंतु असे झाले नाही. आम्ही पाहत आहोत की इस्लाम तर दिवसेंदिवस प्रगतीपथावर आहे. याचे एकमेव कारण पैगंबर मुहम्मद (स.) जवळ आत्मशक्ती होती व मानवतेविषयी प्रेम होते, तसेच वैश्विक प्रेम आणि कृपेची भावना होती. ते लोकांना सदाचाराकडे मार्गदर्शन करीत."

## मानवतेवर उपकार

पंडित भगत साई दास, ॲडव्होकेट (कोहभरी) लिहितात,

श्री रामचंद्र, श्रीकृष्ण, गुरूनानक, पैगंबर मूसा (अ.), पैगंबर इसा (अ.) हे सर्व छोटे राजे होते व सर्वांना जाणीव होती की त्यांचा एक शहंशाह (सम्राट) आहे ज्याचे पवित्र नाव आहे मुहम्मद (स.) त्यांच्या जीवनाची कोणाशीच तुलना करणे शक्य नाही. प्रत्येक समाजसुधारकाने जगात काही न काही सुधारणा केली आहे, याबाबत दुमत नाही, मात्र पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जितके जगावर उपकार केले तितके इतर कोणी केल्याचे उदाहरण सापडत नाही.

## संतुलित जीवनव्यवस्था

वरिष्ट पत्रकार विद्या प्रकाश, जौनपूर (उ. प्रदेश) लिहितात,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मानव समाजास अशी जीवनव्यवस्था दिली आहे जी अनिष्ट प्रथांपासून मुक्त करते व ती संतुलित, स्पष्ट, सुनियोजित व परिपूर्ण व्यवस्था आहे जिच्यात ऐहिक जीवनातला असा एक ही बिंदू नाही की ज्यांचे गंभीरपणे विवेचन केलेले नाही. ही अशी व्यवस्था आहे जी न्यायिक, नैतिक व शांतिप्रद असून जी देश व

समाजातील अत्यंत दीन हीन, अत्याचारित, असहाय व्यक्तींच्या पालनपोषण, संरक्षण व प्रगतीचे विश्वसनीय व निश्चित स्वरूपाचे आश्वासन देते. महिलांच्या शील संरक्षणाची उत्तम व्यवस्था करण्यात आली असून त्यांच्या अधिकारांच्या सुरक्षेची योग्य व्यवस्था करण्यात आली आहे. पाच वेळेच्या दैनिक फर्ज नमाज व ईदच्या नमाजापासून हज व उमराच्या विविध विधींच्या पूर्तता करताना माणसाला माणसाशी, समाजाला समाजाशी जोडण्याचा अतियोत्तम प्रबंध करण्यात आला आहे. गृहस्थी व सन्यास, व्यवहार व वैराग्य, ऐहिक व आध्यात्मिक या सर्वांचे अत्यंत अद्भुत व वैज्ञानिक सामंजस्य साधण्यात आले आहे.

आज समाजात सर्वत्र अशांती, असंतोष, आक्रोश, सुडाचा वणवा धगधगत आहे. याचे कारण असे की, आम्ही अल्लाहच्या आदेशांपासून दूर झालो. मार्गभ्रष्ट झालो, सत्याकडे जाणून बुजून डोळेझाक करीत आहोत. हे निश्चितच अटळ सत्य आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांचा मानवतावादी व कल्याणकारी संदेशच आम्हाला अशांती, कलह व मार्गभ्रष्ट होण्यापासून सुरक्षित करून आमचा उध्दार करील. त्यांचे संपूर्ण जीवनचरित्र आदर्श असून त्यातून आम्हास उपदेशपर शिक्षण प्राप्त होते. प्रत्येक जाती-जमाती व वंशाच्या लोकांकरिता त्यांचे उपदेश उपयुक्त व कल्याणकारी ठरले आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणींचा अवलंब केल्यास वर्तमान समस्यांचे निवारण होऊ शकते व शांती स्थापित होऊ शकते. याशिवाय आपल्याकडे दुसरा कुठलाच विकल्प उपलब्ध नाही.

## संपूर्ण मानवजातीला वरदान

डॉ. रमेश प्रसाद गर्ग यांचे विचार,

''पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कोणालाही शाप दिला नाही. म्हणूनच त्यांना 'रहमतुललिल-आलमीन' म्हटले जाते. त्यांचे सर्वात महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी गुलामगिरीचा अंत केला. गुलामांच्या क्रयविक्रयला विरोध दर्शविला. काळ्या-गोऱ्या, उच्च-नीचमधील अंतर संपुष्टात आणले. त्यांनी सांगितले की, सर्व मानवांना अल्लाहाने निर्माण केले आहे म्हणून ते सर्व एकसमान आहेत. कोणत्याही विशेष कुटुंबात जन्मल्यामुळे कोणतीही व्यक्ती महान व मोठी होत नाही. ती आपल्या कर्मांनी महानता प्राप्त करते. जो जितका संयमी व सदाचारी असतो तितकाच अधिक आदरणीय असतो.

अल्लाह आदिकाळापासून अस्तित्वात आहे व अनंतकालापर्यंत राहणार आहे. त्याचे कोणीही आई-वडील नाहीत. त्याचा कोणीही भाऊ नाही, त्याला पत्नी नाही, मुलगा व मुलगी नाही. तो सर्व प्रकारच्या जागतिक बंधनापासून मुक्त आहे. त्याला कोणत्याच सीमांचे बंधन नाही. आकाश, पृथ्वी व संपूर्ण सृष्टीचा तोच एकमात्र रचयिता आहे. तो माणसांना जन्म देतो. तोच अन्नदाता आहे. तोच जीवन देतो तोच मृत्यू देणारा आहे. मानवाने त्याच्यासमोरच नतमस्तक व्हायला हवे, त्याचीच पूजाअर्चा करायला हवी. जो चांगले कर्म करील त्याला तो स्वर्गात प्रवेश देईल. वाईट कर्म करणाऱ्यास नरकात जावे लागेल. मुहम्मद (स.) यांच्या उपदेशाच्या प्रभावामुळे हळूहळू त्यांच्या अनुयायांची संख्या वाढत गेली. जे उपदेश व जी शिकवण त्यांनी अनुयायांना दिली, त्याचा त्यांनी स्वतः अवलंब केला. ते आपल्या विरोधकांशी नेहमी प्रेमाने वागले.''

## मानवसेवा

बाबू ब्रिज बिहारीलाल, (बी.ए. एलएल.बी.), यांनी लिहिले आहे,

''पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याविषयी अज्ञानामुळे व जाणूनबुजून खोडसाळपणाने असे म्हणणे की, त्यांच्या शिकवणीत रक्तपात व हत्येचा समावेश होता, संपूर्णतः खोटे व आधारहीन आहे. जी व्यक्ती लहान मुलाच्या रडण्याने बेचैन होत असे, जी हजारो अपशब्द ऐकूनही नजर वर करीत नसे, भयंकर शत्रूंनाही क्षमादान देत असे, सर्व काही दीनदुबळ्यांना दान करीत असे, आपल्या हाताने मुस्लिमेतरांची सेवा करीत असे व त्यांच्याशी आदराने वागत असे त्या व्यक्तीच्या बाबतीत असा आरोप करता येईल का? पैगंबर मुहम्मद (स.) यांची शिकवण अशी होती की, जे काही कार्य कराल, प्रामाणिकपणे व आत्मीयतेने करा. त्यांच्या उपदेशांचा मानवसेवा हाच उद्देश होता!''

## क्षमाशीलता

पंडित राम कुवर चौबे, (एम.ए.,एम.आर.ए.एस.) यांचे विचार,

पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या जनतेशी कशा प्रकारे वागत असत याबाबत पुढे दिलेली घटना चांगलाच प्रकाश टाकते.

मदीनाजवळ खैबर नावाचे क्षेत्र आहे. तेथे राहणारे बहुतेक लोक ज्यू धर्मिय होते. त्या लोकांनी एकदा त्यांना विषमिश्रित मांसाहारी भोजन दिले. त्यांनी त्या लोकांना विचारले तेव्हा त्यांनी गुन्हा कबूल केला. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांच्या जघन्य अपराधाबद्दल त्यांना क्षमा केली आणि बदला घेण्याचा विचारसुध्दा त्यांच्या मनात आला नाही. विचार करण्यासारखी बाब आहे की, त्यांच्या वधाचा कट रचणाऱ्या अनेकेश्वरवाद्यांशीही त्यांनी दुर्व्यहार केला नाही. उघड आहे की निर्दोष अनेकेश्वरवाद्यांशी ते निश्चितच कठोर व्यवहार करत नसतील.''

## अजेय शक्ती

प्रख्यात दलित नेता कोडिक्कल चेलप्पा म्हणतात, ''असा सर्वश्रेष्ठ मॅग्नाकार्टा मानवतेने पूर्वी कधी पाहिला नव्हता जसा पवित्र कुरआन मुहम्मद (स.) यांच्याद्वारे मानवाच्या कल्याणासाठी अवतरला आहे. हे एक सागरासारखे आहे ज्यात सर्व नद्या, कालवे, भुयारी व छोटेछोटे झरे सर्वच येऊन विलीन होतात, त्याचप्रमाणे सर्व जातीजमाती व वंशात जन्माला आलेल्या, विविध भाषा बोलणाऱ्या विविध रंगरूपाच्या व्यक्ती एकाच समुदायात सामील होतात. जेव्हा ते इस्लाम स्वीकार करून मुस्लिम होतात व सर्व मतभेद विसरून एका अजेय शक्तीचे रूप धारण करतात.

- 'दासता से इस्लाम की ओर', पृ. ३८

## महिलांचे उध्दारक

अलाहबाद (उ.प्र.) च्या रहिवाशी एस. एस. खन्ना व डिग्री कॉलेजच्या प्रवक्ता डॉ. रीता चौहान म्हणतात,

''पैगंबर मुहम्मद (स.) यांनी महिलांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष दिले व महिलांच्या समस्या निवारण करण्याचे अहर्निश प्रयत्न केले. ते महिलांचे उध्दारक आहेत.''

## अनाचारापासून मुक्ती

डॉ. सुमनचंद 'मुक्तेश' यांनी मुलांकरिता लिहिलेल्या कवितांमध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवनचरित्र लिहिले आहे. या पुस्तकाचे नाव आहे, 'बाबा बोले, सुनो कहानी' यात ते लिहितात,

''इस्लाम धर्माचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे संपूर्ण जीवन उच्च आदर्शासाठी अविरत संघर्षाची कथा आहे. ज्या काळी त्यांचा जन्म झाला त्या काळी संपूर्ण अरबस्थान अज्ञानाच्या अंधकाराने आच्छादित होते. समाजात अनेक अनिष्ट रूढी, परंपरा पसरल्या होत्या. लोक फसवेगिरी, बनवाबनवी व भांडणतंट्यात वेळ घालवीत होते, वेगवेगळ्या मूर्तींची पूजापाठ करून जीवन सार्थक झाल्याचे अर्थहीन समाधान मानत होते. अशा वेळी मुहम्मद (स.) यांचे आगमन ईशवरदानच मानायला हवे.

जीवनाच्या आरंभापासून ते अंतापर्यंत अरब समाजास दुष्कर्मांपासून मुक्त करण्याचे ते जीवापाड कष्ट करीत राहिले. त्यांच्या सतत प्रयत्नांना अनेक चढ-उतारानंतर यश प्राप्त झाले व इस्लाम धर्मांचा प्रचार-प्रसार करून ते काळाच्या पडद्याआड झाले.

- समाप्त -